

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**



एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

सप्टेंबर २०१४




म.सा.परिषदेचे माजी कार्याध्यक्ष आणि कथा-कादंबरीकार श्री.ज. जोशी यांना जन्मशताब्दीनिमित्त अभिवादन.

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

अंक क्र ३४८, सप्टेंबर २०१४

जुलै ते सप्टेंबर

संपादक

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**



प्रकाशक

**प्रकाशक पायगुडे**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०
दूरभाषं ०२०-२४४७५९६३
(कार्यालयाची वेळ : सकाळी ९.३० ते ११.३० दुपारी ४.३० ते ७.३०)

अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका



मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.

अक्षरजुळणी
**स्मिता टाईपसेटर्स**
११२०, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुद्रणस्थळ
**स्मिता प्रिंटर्स**
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०

मुखपृष्ठ सजावटकार : **श्री. हेमंत सरदेसाई**
भ्रमणभाष : ९३२६०७०९३४

**किंमत : १५/- रुपये**

प्रकाशन : सप्टेंबर, २०१४

संपादकीय

## आमुचा रामराम घ्यावा!

– डॉ. सु. प्र. कुलकर्णी

जुलै २००४ ते सप्टेंबर २०१४ पर्यंत महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादनाचे कार्य करायला मिळाले, हे माझ्या आयुष्यातील सहजभाग्य आहे. या काळात म. सा. पत्रिकेच्या संस्थापक-संपादकांची इच्छा वा स्वप्न पूर्ण करण्याच्या दिशेने पावले टाकण्याचा प्रयत्न केला. पत्रिकेचे स्वयंपूर्ण वैभवशाली रूप पाहण्याची त्यांची उत्कट इच्छा होती. तसे ते साध्य झाले आहे असा दावा जरी करता आला नाही; तरी पत्रिकेच्या आंतर-बाह्य स्वरूपात आशादायक बदल झाला आहे. याची पावती असंख्य खुशीपत्रांच्या स्वरुपात मला मिळाली आहे. जुलै २००४ अंक ३१० पासून सुरू झालेल्या माझ्या संपादकीय कामासह आता या सप्टेंबर २०१४ अंक क्र. ३४८ पर्यंत दहा वर्षे मुद्रितशोधन-छपाई ते पोस्टिंग पर्यंतचे सर्व काम मी एकहाती सांभाळले. या काळात श्री. ह. ल. निपुणगे यांच्या मदतीने आणि मी स्वत:, पत्रिकेसाठी भरघोस जाहिरातीही मिळवून दिल्या. मुखपृष्ठाचा विषय आणि त्याची मांडणी-कल्पना देऊन प्रत्येक अंकाला वैशिष्ट्यपूर्ण, आशयानुकूल मुखपृष्ठ करवून घेतले. तसेच आतील लेखात संबंधित पुस्तकाचे मुखपृष्ठ लेखासोबत दिले आणि प्रत्येक लेख वाचून त्यातील आशय आणि समीक्षा कळेल असे 'लीड' दिले. आता... मी स्वेच्छेने वयाच्या ७४ व्या वर्षी निवृत्त होत आहे. डॉ. गं. ना. जोगळेकरांनी मला बोलावून संपादकपदावर बसविले. डॉ. अरविंद कुलकर्णी यांच्या अकाली निधनाने रिक्त झालेल्या संपादकपदाचे काम करण्याची संधी दिली, त्यांचा माझ्याबद्दलचा विश्वास त्यांनी अंक क्र. ३०९ च्या संपादकीयात जाहीरही केला होता. डॉ. जोगळेकरांचे चुलत बंधू श्री. राजाभाऊ जोगळेकर (सी.ए.) हे नगर कॉलेजमध्ये १९६३ ते १९७० प्राध्यापक असताना, 'गं. ना.' नगरला नेहमी येत; आणि 'राजभाऊंच्या मठीवर' आम्हा मित्रमंडळीत ते एकरूप होत. १९६३ पासूनचा आमचा स्नेह पुढे पुणे विद्यापीठातील चर्चासत्रे आणि म. सा. प. च्या निमित्ताने, दृढ होत गेला. त्यांना माझी साहित्यविषयक मते माहिती होती. सर्व थरात जाणाऱ्या म. सा. पत्रिकेसारख्या वैचारिक नियतकालिकांच्या माध्यमातून येणारी समीक्षा ही शब्दज्जड आणि परिभाषेच्या गुंत्यात न अडकता; सर्वांना (समीक्षेचा दर्जा सांभाळून) आस्वाद्य आणि समीक्षादृष्टी देणारीही असावी; यावर आमचे एकमत होते. त्यामुळे संधी मिळताच त्यांनी मला म. सा. पत्रिकेच्या संपादनकार्याची संधी दिली; याबद्दल मी त्यांचा कायमचा ऋणी आहे. आम्ही मतभेद होऊनही एकमेकांचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व जपले होते. माझ्यावर अहमदनगरच्या साहित्यसंमेलनाच्या कार्याध्यक्षपदाची जबाबदारी सोपविली होती. त्यापूर्वी नगरला की आळंदीला संमेलन भरवावे; यासाठी 'गं. नां.'शी कडाक्याचे जाहीर मतभेद झाले होते. नगरच्या संमेलनात काही वादग्रस्त ठराव आणून गुलजार, बासू भट्टाचार्य, गिरीश कर्नाड यांच्या-सारख्यांच्या दुर्मिळ व्यक्तींच्या भाषणाचा लाभ नगरकरांना मिळण्यात कदाचित व्यत्यय







येईल, म्हणून ही भाषणे झाल्यावर प्रस्ताव मांडावेत; असा संमेलनाचा कार्याध्यक्ष ह्या नात्याने माझा आग्रह होता. प्रसारमाध्यमांची टीका सहन करून मी ठरावांचा भाग पुढे (भाषणानंतर) घेतला. पण यावेळी गं.नां.शी तीव्र मतभेद झाले होते. म. सा. प. च्या कार्यपद्धतीबाबतही वेळोवेळी मतभेद झाले, दुर्दैवाने तेवढेच लोकांसमोर आले. परंतु 'ग्यानबाची समीक्षा' असावी; यावर आमचे एकमत होते. हा दृष्टिकोन धरून म. सा. पत्रिकेचे बाह्यरूप आकर्षक करण्यासाठी पत्रिकेचा हा लहान 'डेमीसाईज' आकार बदलून, पत्रिकेच्या स्थापनेच्या काळातील 'डबल क्राऊन' आकार स्वीकारला. तो जाहिरातदारांसाठी आवश्यक तर होताच; परंतु सुटसुटीत छपाईसाठीही सोयीस्कर ठरला. पत्रिकेचे मुखपृष्ठ-मलपृष्ठे चाररंगी केली. मुखपृष्ठावरील चित्र/ गयाचित्र-आविष्कार आणि संपादकीय, यांचे नाते ोडले.

कालमानानुरूप आणि विषयानुरूप मुखपृष्ठ हे पत्रिकेचे वैशिष्ट्य ठरले. संपादकीय हे वाचकांसमोर एखाद्या नव्या अलक्षित विषयाला स्पर्श करणारे असावे, असे धोरण स्वीकारले. ते लोकप्रिय झाले. विशेषत: नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ आणि 'ग्रेस' यांच्या कवितेमुळे काव्यातील रसभावचर्चेला, सौंदर्यशास्त्राला दिलेले नवे वळण, भावगीताच्या जडणघडणीतील 'शुक्तिबिंदु' योग, 'शब्दवती' कविता, कार्य न करता छाती फुगवून अवास्तव 'होर्डिंग्ज'च्या जगात वावरणारे सर्व्हांटिसचे 'डॉन क्विक्झोट' म्हणजेच मराठीत सत्तर वर्षापूर्वीच रूपांतरित झालेला 'महाराष्ट्र भाषाचित्रमयूर', कृ. ना. आठल्येंचा 'फांकडे तरवार बहादर', आर. के. लक्ष्मण यांच्या रेषाविष्कारातील 'कॉमन मॅन'चे व्यक्तिमत्त्व, शंभर वर्षानंतरही ताजे वाटणारे रमाबाई रानडे यांच्या 'आमच्या जीवनातील आठवणी' ह्या चरित्रात्मक आत्मचरित्रावरील संपादकीय, विज्ञानकथा, वसंत आबाजी डहाकेंच्या काव्यातील न-नायक 'काळोखाचा राजपुत्र', कवी ग्रेस यांच्या कवितेची 'अमरकण्टकाची वाटचाल', विरूपिकेच्या सौंदर्यशास्त्रावरील संपादकीय इ. चे वाचकांनी मनापासून स्वागत केले.

मराठी साहित्यातील नवे प्रवाह अधोरेखित करणारे विशेषांक, हे या दशकातील वैशिष्ट्यपूर्ण अंक ठरावेत. विज्ञानकथा (अंक क्र. ३१५, ३३७), 'बोली'चे साहित्यरूप आणि भाषारूप (अंक क्र. ३२८ आणि त्यानंतर बोलीविषयी लेख अंक क्र. ३२९, ३३०, ३३१, ३४० या अंकांमधून सुमारे पंधरा बोलीविषयी लेख.) संत तुकाराम आणि समर्थ रामदासांच्या चौथ्या जन्मशताब्दीनिमित्त प्रकाशित केलेल्या अंक क्र. ३२४ आणि ३२५ यांची लोकप्रियता पाहून सोलापूरच्या 'सूर्या' अध्यापन साहित्य प्रकाशन-संस्थेने हे दोन्हीही अंक मिळून, 'संत तुकाराम आणि समर्थ रामदास – विशेष स्मरण' या नावाने, ग्रंथ प्रकाशित केला आहे. मराठी साहित्यातील नाट्याविष्कार इ. चा नव्याने परामर्श घेणारा 'नाट्यविशेषांक' (अंक क्र. ३३३), लघुकादंबरी – महानगरी कथा – नवकथा यांचे 'कथारूप' – विशेषांक (अंक क्र. ३२७ व ३३७) अभ्यासकांना मार्गदर्शक असा दर्जेदार आहे. कै. ग. ल. ठोकळ जन्मशताब्दीनिमित्त 'ग्रामीण साहित्य विशेषांक' आणि महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शताब्दीपूर्तीचा प्रारंभ आणि शताब्दीपूर्तीची सांगता असे विशेषांक म्हणजे परिषदेचा दस्तऐवज आहे. साहित्य पत्रिकेला शंभर वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने, शंभर वर्षातील निवडक लेख, तत्कालीन भाषाचळवळ, स्त्रीसुधारणांची चळवळ, इतिहासलेखनाची जागृती इ. प्रबोधनयुगाची वैशिष्ट्ये स्पष्ट करणारा शताब्दीपूर्ती विशेषांक आहे.

नव्या ग्रंथांमधील, वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथांची दखल घेऊन, त्यातील आशय अधोरेखित करणारे नवे सदर 'निवडक नवे'; सुरू केले. त्यास उत्तम प्रतिसाद मिळाला. सोबत जुलै २००४ ते सप्टेंबर २०१४ ह्या दहा वर्षांतील ३७ अंकांची ढोबळ मानाने सूची ह्या अंकातच जोडली आहे. (पान नं. ४५ ते ५७)

या काळात, पुण्याबाहेरच्या आणि विशेषत: ग्रामीण भागातील अभ्यासू नवलेखकांना स्थान दिल्याचे दिसेल.

साहित्यपरिषदेचे सुमारे ११ ते १२ हजार आजीव सदस्य असून त्यांना त्यांचा हक्क म्हणून अंक विनामूल्य पाठविला जात आहे. 'पत्रिके'त संशोधन, परीक्षण आणि समीक्षालेखनच असावे; असा दंडक आपल्या घटनेने आणि 'ट्रस्ट डीड'ने घालून दिलेला आहे. त्यामुळे लोकप्रिय कथा, कविता आणि कादंबऱ्यांना यात स्थान देता येत नाही. मराठी साहित्यात कोणते नवे प्रवाह येत आहेत, त्यांचा परिचय करून देणारे आणि कथा-कादंबरी-कवितेची समीक्षा लिहून त्या ग्रंथांचा परिचय करून देणारे साहित्यच यात असले पाहिजे, असे प्रा. द. वा. पोतदारांचे म्हणणे होते. ते नियमांना धरूनच आहे. गेली शंभर वर्षे, 'पत्रिका' याच मार्गावरून साहित्यसेवा करीत आहे. त्यासाठीच संपादकपद नियुक्तीने भरण्याची तरतूद आहे. त्यामुळे साहित्यसंशोधन, परीक्षण आणि समीक्षेचे भान आणि ज्ञानही असणारा संपादक नेमला पाहिजे. कार्यकारी मंडळातील सक्षम व्यक्तींनी हे विनावेतन जिकिरीचे काम करण्याचे नाकारले, तर कार्यकारिणीच्या बाहेरील योग्य व्यक्तीची नियुक्ती करावी, आणि वेळ पडल्यास त्यास कामाचा मोबदलाही द्यावा; अशी परिषदेच्या 'ट्रस्ट डीड' मध्ये तरतूद आहे. मी गेली दहा वर्षे माझ्यापरीने संपादकपद सांभाळले आहे. आता वयोमानाने (वय ७४) मला नगर-पुणे एसटी-प्रवासाची दगदग होत नाही; म्हणून शताब्दीपूर्ती अंकानंतरच मी निवृत्त होण्याची विनंती केली होती. ती आता मान्य झाली आहे. या काळात परिषदेचे नुकसान होईल अशी कोणतीही चूक माझ्याकडून झालेली नाही. मी दहा वर्षे सातत्याने ३७ अंकांचे संपादन करून, साहित्यपत्रिकेला नवा आकार-रंगरूप देऊन या काळातील नव्या प्रवाहांची दखल घेतली आहे. त्यासाठी साधा प्रवासखर्चही घेतलेला नाही; कारण ही मातृभाषेची सेवा आहे!

आता आमचा रामराम घ्यावा!... आणि काही अपराध झालेच असतील, असे कुणाला वाटत असेल, तर... क्षमस्व! कविवर्य भा. रा. तांबे यांच्या शब्दात म्हणावेसे वाटते–

*'...सेवा ही पूर्वीची स्मरोनी ।*
*करी न रोष, सखया, 'कृपा' करी...!'*

सु. कुलकर्णी

संपादक
महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, पुणे ३०, फोन- ९७६७६९९३१९

संपर्क : ७ 'सूर', गायकवाड वसाहत, सावेडी मार्ग,
अहमदनगर ४१४ ००३. दूरभाष : ०२४१-२४२९७५५
भ्रमणभाष : ९७६७६९९३१९

[ह्या अंकाच्या मुखपृष्ठावर, चरित्रात्मक कादंबरीकार म्हणून मराठी साहित्याला नवे वळण देणाऱ्या, साहित्यिक श्री. ज. जोशी यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांना अभिवादन केले आहे; आणि मलपृष्ठ ३ वर अ. भा. मराठी साहित्यसंमेलन 'नामदेवकी घुमानी' येथे होत असल्याने नामदेव महाराजांचे पुण्यस्मरण केले आहे. सदर अंक हा एप्रिल ते सप्टेंबर २०१४ असा आहे.]



अनुक्रमणिका







(मुखपृष्ठ कथा)

## 'श्रीज' — एक आनंदाची बखर!

– ह.ल. निपुणगे

*[कै. श्री. ज. जोशी यांच्या जन्मशताब्दी वर्षाचा प्रारंभ झाला आहे. मराठी साहित्यातील 'हरी नारायण' ह्या डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या कादंबरीकार ह.ना. आपटे यांच्या जीवनावरील चरित्रात्मक लघुकादंबरीनंतर, 'आनंदी-गोपाळ' ह्या कै. श्री.ज. जोशी ह्यांच्या कादंबरीने वाचकांच्या मनाचा ठाव घेतला. संततीनियमनाविषयी जनजागृतीचे उपेक्षित पण द्रष्टे कार्य करणारे र.धों. कर्वे यांच्या जीवनावरील 'रघुनाथाची बखर' ह्या कादंबरीने चरित्रात्मक कादंबरीचा एक आकार निश्चित केला. चरित्रकथा–बखर– कलात्मक चरित्र– चरित्रात्मक कादंबरी अशी उत्क्रांती मराठी साहित्यात स्पष्ट जाणवते. कै. 'श्री.जं.'ची, ही मराठी साहित्याला वैशिष्ट्यपूर्ण वळण देणारी, देणगी आहे. 'सदाशिव पेठी' म्हणून त्याची उपेक्षा करता येणार नाही; कारण ह्या कादंबऱ्यांमधून महाराष्ट्राच्या प्रबोधनयुगाला बोलते केले आहे. 'श्रीजं'च्या जन्मशताब्दी वर्षाची ही दखल, 'श्रीजं'चे स्नेही ह.ल. निपुणगे यांनी घेतली आहे. –संपादक]*

'आनंदी-गोपाळ'कार म्हणून प्रसिद्ध असलेल्या 'श्रीजं'नी आपल्या लेखनास खरी सुरुवात कथालेखनापासून केली. त्यांचा पहिला कथासंग्रह 'पांढरपेशांचे जग' हा १९४० साली प्रकाशित झाला. या संग्रहातील कथा जुन्या वळणाच्या – 'सदाशिव पेठी' म्हणता येतील अशा आहेत. त्यांचा दुसरा कथासंग्रह 'सुलभा' १९५९ साली मौज प्रकाशनाने प्रकाशित केला. या संग्रहातील कथांमध्ये श्रीजंनी पांढरपेशांच्या जगाच्या मर्यादा ओलांडून ते बदलले, विस्तारले. त्यांनी या कथांमध्ये अधिक खोल कलागुणांचा वेध घेतला आहे. त्यानंतर त्यांचा 'मामाचा वाडा' हा कथासंग्रह आला. त्यात त्यांनी वास्तवाच्या सूक्ष्म व गूढ मर्माचा शोध घेतला आहे.

मध्यमवर्गीयांच्या सुख-दुःखांचे मर्मभेदी वर्णन आणि नीटस व्यक्तिरेखा त्यांच्या एकूणच कथालेखनात आढळतात. त्यांच्या कथा वाचताना स्वतःच्याच जीवनातील अनेक अनुभव वाचल्याचे वाचकांना जाणवल्याशिवाय रहात नाही. श्रीजंनी विपुल कथालेखन केले आहे. त्यांचे २६ कथासंग्रह आहेत.

यानंतर त्यांनी लिहिलेली 'आनंदी-गोपाळ' ही कादंबरी 'व्यक्ती आणि समाज अशा दुहेरी चरित्राचा एकात्म आविष्कार बांधणारी आहे. चरित्रात्मक कादंबरीचे युग नुकतेच सुरू झाले होते. जास्तीत जास्त लोकप्रिय-वाचकप्रिय झालेली; आणि विक्रीचाही उच्चांक केलेल्या या कादंबरीची पहिली आवृत्ती जानेवारी १९६८ मध्ये प्रकाशित झाली. त्यानंतर एकापाठोपाठ एक आवृत्त्या प्रकाशित होत राहिल्या. दहावी आवृत्ती २०१३ साली प्रकाशित झाली. सतत ४५ वर्षे सातत्याने खपत राहिलेली ही पहिलीच चरित्रात्मक कादंबरी म्हणावी लागेल.

प्रचलित समाजास्थितीचा आणि 'आनंदी-गोपाळ'च्या चरित्राचा सखोल व्यासंग, अतिशय रसाळ अशी निवेदनशैली, कथाविषयाचा वेगळेपणा आणि त्यात ओतप्रोत भरून राहिलेले नाट्य; हे या कादंबरीचे वैशिष्ट्य आहे.

दलाल आर्ट स्टुडिओचे उत्कृष्ट मुखपृष्ठ आणि मॅजेस्टिकच्या केशवराव कोठावळे यांनी या कादंबरीचे केलेले प्रकाशन हा चांगला योग कादंबरीच्या नशिबी जमून आला.



यानंतर 'श्रीजं'ची वेगळी आणि वैशिष्ट्यपूर्ण सामाजिक चरित्रात्मक कादंबरी म्हणजे 'रघुनाथाची बखर!' मनात दीर्घकाळ सलणाऱ्या कुतूहलाची जिद्दीने आणि आत्मविश्वासाने केलेली कलात्मक पूर्तता!

"अनेक कुतूहले पोटी ठेवून श्रीजंनी ऐतिहासिक चरित्र वास्तवात कोरलेला व्यापक, संपृक्त (परिपूर्ण?) कलात्मक आकार म्हणजे ही कादंबरी होय. सूक्ष्मतरल तपशील भरत भरत, अकृत्रिमपणे वातावरणमय होणाऱ्या धीम्या, दमदार शैलीने बांधलेला या 'बखरी'चा घनगंभीर आकार शुद्ध खानदानी ख्याल ऐकल्याचे समाधान देतो." असे सुप्रसिद्ध समीक्षक प्रा.स.शि. भावे यांनी या कादंबरीच्या मलपृष्ठावर दिलेल्या मजकुरात म्हटले आहे.

या कादंबरीची पहिली आवृत्ती जानेवारी १९७७ मध्ये प्रकाशित झाली; आणि दुसरी आवृत्ती फेब्रुवारी २०१२ मध्ये, म्हणजे तब्बल ३५ वर्षांनी, प्रकाशित झाली!




ही कादंबरी अभ्यास करून लिहिण्यास त्यांना चार-पाच वर्षांचा कालावधी लागला. मध्यंतरी एक-दोन वर्षे त्यांना या कादंबरीच्या विषयाच्या विचारापासून दूर राहावे लागले. त्यांच्या मुलाचे लग्न होऊन काही काळ लोटला होता; पण अपत्यप्राप्ती मात्र होत नव्हती. त्यामुळे नाही म्हटले तरी संततीनियमनाच्या विषयावरील ह्या कादंबरीचा विचार आणि घरात मात्र पाळणा कधी हलेल याची चिंता! या द्वयात ते सापडले. हे त्यांनी एका भेटीत मला मनमोकळेपणाने सांगून टाकले. मी पण थोडा वेळ चक्रावलो. मग म्हणालो, "श्रीज, तुम्ही या कादंबरीचा विचार काही काळ पुढे ढकलावा, असे मला वाटते."

त्यांनाही ते पटले असावे. वर्ष दोन वर्षे त्यांनी हा विषय मागे टाकला. त्यांच्या घरी अपत्यप्राप्तीची चिन्हे दिसू लागली. यथावकाश ही इच्छा पूर्णही झाली!

मग पुन्हा जोमाने कामाला लागून त्यांनी ही कादंबरी लिहून पूर्ण केली; आणि ती प्रकाशितही झाली.

श्रीजंनी कथा, कादंबऱ्यांबरोबरच विपुल स्फुट लेखनही केले. केसरी, सकाळ, तरुण-भारत, महाराष्ट्र टाइम्स या वृत्तपत्रांमधून त्यांचे हे स्फुट लेखन प्रकाशित होत होते. त्यांचे 'भरती-ओहोटी' हे सदर, सकाळमधून काही काळ दर रविवारी, प्रकाशित होत होते. 'पुणेरी' हा श्रीजंचा ललितलेखांचा पहिला संग्रह. त्याची पहिली आवृत्ती १९७८ साली प्रकाशित झाली. दुसरी आवृत्ती १९८२ साली आणि तिसरी आवृत्ती २००९ साली प्रकाशित झाली. या पुस्तकाचे मुखपृष्ठ शि.द. फडणीस यांचे आहे. पुण्याच्या श्रीविद्या प्रकाशन यांनी हे पुस्तक प्रकाशित केले आहे.

या संग्रहातील लेख नुसतेच ललित नाहीत, तर त्या प्रत्येक लेखामागे पुण्यातील मध्यमवर्गीय समाजात झालेल्या परिवर्तनाची तीव्र जाणीवही आहे. शहराचा चेहरा, जिमखाना, पुण्यात दुमजली बस, नूतन मराठी, हुजूरपागेतल्या मुली, जुन्या पुण्याचे प्रतिबिंब, नगर वाचन मंदिर आदि उत्तमोत्तम लेख आहेत.

त्यांच्या स्फुट लेखनात 'पुणेरी' हा संग्रह विशेष गाजला. त्यांनी काही पुस्तकांचा अनुवादही केला. एकंदरीत साहित्यक्षेत्रातील त्यांची मुशाफिरी, नवा आकार आणि आविष्काराच्या वाटेने, समृद्ध झाली.

काही काळ त्यांची मुंबईला बदली झाली होती. त्या काळात त्यांना केशवराव कोठावळे, जयवंत दळवी, मधु मंगेश कर्णिक, रमेश मंत्री, सुभाष भेंडे आदि नामवंत साहित्यिकांचा सहवास लाभला.



'श्रीज' लेखक म्हणून जितके 'रसाळ' होते; तितकेच ते 'माणूस' म्हणूनही वागायला अतिशय चांगले होते. त्यांना बोलायला, गप्पा मारायला खूप आवडायचे. पुण्यातही त्यांचे विद्याधर पुंडलीकांसारखे अनेक साहित्यिक मित्र होते.

त्यांच्या स्वभावाची एक आठवण सांगण्यासारखी आहे. प्रपंच प्रकाशनाचे माधव कानिटकर हे त्यांचे खास मित्र होते. सुप्रसिद्ध साहित्यिक विद्याधर पुंडलीक, वि.ग. कानिटकर, दि.बा. मोकाशी, बाळ गाडगीळ असा त्यांचा पुण्यातल्या लेखकांचा स्नेहपरिवार होता.

प्रपंच प्रकाशनाचे कार्यालय त्यावेळी काही काळ शनिवार पेठेत, माझ्या कार्यालयाजवळच होते. मधून-अधून त्यांच्याकडे आले की, 'श्रीज' माझ्याकडे डोकवायचे; गप्पा व्हायच्या. पुष्कळदा आम्ही 'स्वीट-होम'मध्ये इडली-सांबार खायला जायचो.

श्रीज नेहमी आनंदी आणि हसतमुख असायचे म्हणून मी त्यांना गमतीने 'आनंदीगोपाळ' असे म्हणत असे. आमच्या तासन्‌तास गप्पा चालत असत. ते त्यावेळी जंगली महाराज रस्त्यावर संभाजीपार्कसमोरच्या डॉ. देवधर यांच्या बंगल्यात रहात असत. मी रोज संभाजीबागेत सकाळी फिरायला जात असे. काही वेळा सकाळीच त्यांच्याकडे चहा घ्यायला जात असे. चहापानाबरोबर काहीतरी खायलाही असे. तासभर, वेळ असेल त्याप्रमाणे, विविध विषयांवर गप्पा होत असत. पुढे श्रीजंनी पौड रोडवर भारती विद्यापीठाजवळ बंगला बांधला व ते तिकडे राहायला गेले. त्या बंगल्याला त्यांनी 'शब्दश्री' हे यथार्थ नाव दिले.

ऑक्टोबर १९७६ मध्ये मी पौडरोडला घेतलेल्या फ्लॅटची वास्तुशांत होती. त्या दिवशी मी माझ्या सर्व मित्रमंडळींना भोजनासाठी बोलविले होते. त्यात अनेक साहित्यिक होते. अर्थात श्रीजंनाही खास निमंत्रण होतेच. सर्वांबरोबर त्यांनीही भोजनाचा आस्वाद घेतला. श्रीजंना माझा छोटेखानी तीन रुम्सचा फ्लॅट खूपच आवडला. जाताना ते हसत हसत माझ्या पाठीवर प्रेमाची छाप मारीत म्हणाले, "निपुणगे आता या फ्लॅटमध्ये छानदार फर्निचर करून टाका" मी मनात म्हणालो, "कुठून करणार?" पण उघडपणे हळूच त्यांना म्हणालो, "अहो, याच फ्लॅटचे अजून थोडे देणे आहे!"

"फिटेल हो! काळजी करू नका! असं करा एक-दोन दिवसांनी घरी या! मग आपण बोलू."

मी दोन-चार दिवस घरच्या कामात होतो. काहीच फर्निचर नव्हते. घर जवळपास रिकामेच होते. जुन्या घरातले थोडे सामान होते.

मग एक दिवस सकाळीच मी श्रीजंच्या घरी पोहोचलो. त्यांनी माझे स्वागत केले. "काय म्हणतंय नवं घर!" ते हसत हसत म्हणाले, मी क्षणभर गप्प बसलो. ते माझ्याकडे कौतुकाने पाहात होते. मग म्हणाले, "फर्निचरचा विचार करताय ना?"

"होय हो. फ्लॅटचं क ं तरी भागलं. आता फर्निचरचे काय करावे, हेच कळत नाही."

ते पुन्हा एकदा हसले. मग म्हणाले, "हल्ली हप्त्याने फर्निचर मिळते. आवश्यक तेवढे घ्या."

मी नुसतीच मान डोलावली. मग श्रीजंच पुढे म्हणाले, "मी तुम्हाला थोडी मदत करतो." मी त्यांच्याकडे पाहातच राहिलो. "मला वाटतं दहा-बारा हजारांत आवश्यक तेवढे फर्निचर येईल. मी तुम्हाला तीन हजार उसने देतो. सवडीने परत करा!"

मी चाटच पडलो, कारण श्रीज हे अत्यंत व्यवहारी म्हणून प्रसिद्ध होते.

"पण माझी एक अट आहे!" ते पुढे म्हणाले, मी बघतच राहिलो. आता हे काय म्हणतात! "मला एक साक्षीदार हवा आहे!" मला कळेना, ह्यांना जामीनदार हवा की काय?

मग त्यांनीच पुढे खुलासा केला. "मी कुणाच्या तरी, म्हणजे आपल्या दोघांच्या ओळखीच्या गृहस्थांसमोर, हे पैसे रोख तुम्हाला देईन. फक्त केशवरावांच्यासमोर नाही."

मी विचार करीत राहिलो. ते पण शून्यात दृष्टी लावून फिरत्या पंख्याकडे पाहात होते.

मला एकदम सुचले, "मोदी चालेल का?"

ते एकदम मनापासून हसले, म्हणाले, "चालेल!"

मग आमचे ठरले. दोन दिवसांनी संध्याकाळी ते बाजीराव रोडवरील मॅजेस्टिकच्या दुकानात आले. त्यांनी मोदींच्यासमोर माझ्या हाती तीन हजार रोख ठेवले. पावती वगैरे काही नाही. मग माझ्या लक्षात आले. मोदींच्याही लक्षात आले. जर मला पैसे परत द्यायला विलंब लागला असता; तर मोदींनी माझ्या पुस्तकांच्या देणे बिलातून ही रक्कम कापून घेऊन 'श्रीजं'ना दिली असती; आणि झाले तसेच! मी थोडे थोडे करून मोदींकडे तीन हजार साठवले. थोडा उशीर झाला; तरी हे पैसे मी श्रीजंना परत केले. अर्थात मोदींना साक्षीदार ठेवण्यात श्रीजंचे जे व्यवहारचातुर्य होते; त्याला तोड नाही!

श्रीजंनी ही मदत मला का केली असावी याचा मी खूप विचार केला, आणि 'रघुनाथाची वखर' या पुस्तकाच्या लेखनाच्या वेळी मी त्यांना कसा धीर दिला; याची आठवण झाली.

श्रीजंना काटकसरी म्हणणाऱ्यांना त्यांच्या स्वभावाचा हा पैलू नव्याने माहीत होईल. माझ्या 'हलचल' या आत्मकथनात, मी हा किस्सा विस्तृतपणे मुद्दाम, लिहिला आहे.

आता 'श्रीज' आणि महाराष्ट्र साहित्य परिषद या विषयी!

श्रीज १९७५-७६ साली म.सा.परिषदेचे कार्यवाह होते. १९७६ ते १९७९ अशी तीन वर्षे ते कार्याध्यक्ष होते. आणि १९८२-८३ साली ते परिषदेचे अध्यक्ष होते. त्यांच्या कार्याध्यक्षपदाच्या कारकीर्दीत तत्कालीन पंतप्रधान मुरारजीभाई देसाई यांनी म.सा.प.ला भेट दिली होती. ती घटना श्रीजंना खूपच आनंददायी वाटली यात शंका नाही.

श्रीज म.सा.प.चे कार्याध्यक्ष असताना नियमितपणे सायंकाळी परिषदेत येत असत. त्याकाळी परिषदेत आजच्यासारखी कामाची गर्दी-गडबड नसायची. अनेक नामवंत साहित्यिक, संध्याकाळच्यावेळी, परिषदेत सहज डोकावत असत; आणि श्रीज त्यांचे हसून स्वागत करीत. 'या!' असे म्हणून खुर्चीकडे बोट दाखवून मुक्तपणे हसत असत.

त्याकाळी परिषदेतील वातावरण एकूणच आनंददायक होते; हे मात्र खरे!

श्रीज पुणे नगर वाचन मंदिराचेही तीन वर्षे अध्यक्ष होते. नगरवाचनमंदिरात दर्शनी जागेवर त्यांचे छायाचित्र लावलेले आहे. ते पाहून आजही मला त्यांची खूप आठवण येते.

श्रीजंचे चिरंजीव विश्वासराव जोशी यांनी श्रीजंच्या स्मरणार्थ पुणे नगर वाचन मंदिराला देणगी देऊन दरवर्षी ११ जानेवारीला एक वर्ष कथासंग्रहाला, एक वर्ष ललित लेखाला आणि एक वर्ष कादंबरीला अशी पारितोषिके ठेवली आहेत. मी पाच वर्षे पुणे नगर वाचन मंदिराच्या कार्यकारिणीवर होतो.

आजही सकाळी संभाजीबागेत फिरायला गेल्यावर समोर दिसणारा डॉ. देवधर यांचा बंगला, जिथे श्रीज अनेक वर्षे वास्तव्याला होते, पाहिल्यावर आणि म.सा.प. व पुणे नगरवाचन मंदिरात गेल्यावर, श्रीजंची आठवण झाल्याशिवाय राहात नाही. श्रीजंचे हसरे व्यक्तिमत्त्व नजरेसमोर तरळत रहाते.

१ ऑगस्ट २०१४ ला त्यांच्या जन्मशताब्दी वर्षाची सुरुवात होत आहे. वर्षभर तरी त्यांच्या साहित्यावर काही ना काही चर्चा, परिसंवाद व्हावेत; असे मनापासून वाटते. त्यांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन!

***

**ह.ल. निपुणगे**
३८१ अ १, शनिवार पेठ,
कन्याशाळेजवळ, पुणे ४११०३०
दूरभाष : (०२०) २४४८३०६२
भ्रमणभाष : ९८२३५४६०



अनुक्रमणिका

## श्रीकृष्ण जनार्दन जोशी तथा 'श्रीजं'ची साहित्यसंपदा

(जन्म : १ ऑगस्ट १९१५ – निधन : १३ जानेवारी १९८९)

**कथासंग्रह**
पांढरपेशाचे जग.
सुलभा.
उत्तरध्रुव.
अंगण.
मामाचा वाडा.
कोंवडी.
ओलेते दिवस.
पंढरीनाथ.
संगत.
सूर्यापोटी.
निवडक 'श्रीज'.
पालवी.
अनुभव.
समाधी.
नावनिशाणी.
ऑडिट टूर.
ञरता उन्माद.
प्रकाशाची सावली.
साखळी.
प्लीज, पुन्हा नको!
कलंकिनी.
श्रृंगारवेल.
अनिकेत.
थोडं माझं पण...
डेडएण्ड.
समज.

**सामाजिक कादंबऱ्या**
यात्रा.
चार्वाक.
धुमकेतू.
स्थावर.
दुहेरी.
समिधा.
गोमती.
हॉटेल पॅलेस.
काचपात्र.
वृत्तांत.

**चरित्रात्मक कादंबऱ्या**
आनंदी गोपाळ.
रघुनाथाची बखर.

**शरद्चंद्र चटोपाध्याय यांची भाषांतरित**
काळी माती हिरवी माती
(मैला आँचल).
पुरोची कहाणी
(पिंजर-पंजाबी).
गवतातील घरकुल
(वाईंडर-इंग्रजी).
माझी माणसं
(भाषांतर).
मृगजळ
(राईस ऑफ सिलासलॅम्फा).
इथे थबकली गंगामाई
(The Bend in River).
गाईड
(आर.के. नारायण).

**ललित लेख**
पुणेरी.
जोशी पुराण.
सुचलं-लिहिलं!
भरती-ओहोटी.
माझ्या साहित्याचा बॅलन्सशीट.

**संकीर्ण.**
ऐलमा पैलमा (२ खंड).
सोन्याचे क्षण (मुलांसाठी).
साजणी (ना.ह. आपटे यांच्या कादंवरीचे संक्षिप्तीकरण).
श्रीकृष्ण (६ भाग).

मराठी साहित्यात श्री. ज. जोशी हे चरित्रात्मक कादंवरीकार म्हणून जरी ओळखले जातात, तरी त्यांनी साहित्याच्या बहुतेक सर्व महत्त्वाच्या प्रांतात लेखन केले आहे. कथा, सामाजिक कादंवरी, ललित लेखन, अनुवाद, संक्षेपक, आणि सहा भागांमध्ये श्रीकृष्णचरित्र असे चौफेर लेखन केले आहे, हे वरील 'साहित्यसंपदेच्या' यादीवरून दिसून येईल. – ह.ल. निपुणगे

## म.सा. पत्रिकेचे नवे संपादक : श्री. महेंद्र मुंजाळ

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे म. सा. पत्रिका हे त्रैमासिक मराठी भाषेतील साहित्यसंवर्धन, समीक्षा आणि वैचारिक वाङ्मयाला वाहिलेले नियतकालिक. गेली १० वर्षे संपादक या नात्याने डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांनी ही जबाबदारी समर्थपणे सांभाळली. आता त्यांच्या इच्छेप्रमाणे ते निवृत्त होत आहेत. त्यामुळे रिक्त झालेल्या संपादकपदावर तरुण पिढीचे प्रतिनिधित्व करणाऱ्या हरहुन्नरी व्यक्तिमत्त्वाच्या श्री. महेंद्र मुंजाळ यांची कार्यकारी मंडळाने नियुक्ती केली आहे. त्यांचे मन:पूर्वक अभिनंदन व शुभेच्छा! सर्व सन्माननीय वाचकांनी या तरुण संपादकास सहकार्य करावे, ही विनंती.

– प्रकाशक










## हा 'तेल' नावाचा इतिहास...! गिरीश कुबेर यांचे ग्रंथ

– डॉ. वृंदा कौजलगीकर

*[जागतिक राजकीय संघर्षाचे केंद्र 'तेल उत्पादना'भोवती फिरते आहे. गिरीश कुबेर यांच्या साक्षेपी लेखणीतून ते कसे उतरले आहे, याचे विवेचन करणे आणि त्याचे महत्त्व अधोरेखित करणे, हा ह्या लेखाचा हेतू आहे. डॉ. कौजलगीकर ह्यांनी, साध्या-सरळ भाषेत त्याचे मूळ संहितेला धरून, विवेचन केले आहे. हा केवळ नवा विषय नाही; तर रोमांचक इतिहासही आहे. साहित्याला नवे आवाहन देणारा! आणि उद्बोधकही!! –संपादक]*

गिरीश कुबेर यांचे 'हा तेल नावाचा इतिहास आहे' हे पुस्तक २००६ साली जून महिन्यात प्रसिद्ध झाले. फेब्रुवारी २०१३ला त्याची दुसरी आवृत्ती बाजारात आली. त्यानंतरचे दुसरे 'एका तेलियाने' हे पुस्तक २००८ साली प्रकाशित झाले. त्याची सातवी आवृत्ती सप्टें. २०१३ ला निघाली. 'अधर्म युद्ध' हे तिसरे पुस्तक मार्च २००९ साली प्रकाशित झाले. त्याची पाचवी आवृत्ती मार्च २०१३ला बाजारात आली. 'युद्ध जीवाचे' हे ४थे पुस्तक ऑगस्ट २०१०ला प्रकाशित झाले. चार-पाच वर्षात चार पुस्तके या लेखकाकडून मराठी वाचकांना मिळाली. आणि विषयही नवीन! जगाची द्वारे किलकिली करून दाखवणारे. जगात तेलावरून काय ब्रह्मांड चालले आहे; याची सुतराम कल्पना मराठी वाचकांच्या जगतात, पुस्तकाच्या माध्यमातून, कुणालाही येत नाही. ती या लेखकाने करून दिली. जगाच्या अर्थकारणात तेलाचे महत्त्व खूप आहे. तेलामुळे युद्धं होतात. पश्चिम आशियातील तेलसंपन्न देश आणि त्यांना अंधारात ठेवून, त्यांच्या अडाणीपणाचा फायदा घेऊन, त्यांच्या नैसर्गिक साधन संपत्तीवर डल्ला मारणारे पाश्चात्त्य देश. त्यातले धूर्त व अप्पलपोटे राजकारणी आणि त्यांच्या माजलेल्या तेलकंपन्या या सार्‍यांचे चित्रण थक्क करणारे आहे. ते रंजक तर आहेच; पण आपल्याला खिळवून ठेवणारे आहे. या वेगळ्या जगातल्या घडामोडी आपल्याला अनभिज्ञ होत्या. त्यांची ओळख गिरीश कुबेरांनी आपल्याला करून दिली; आपले अनुभवविश्व वाढवले; हे निःसंशय! स्वत: लेखक 'हा तेल नावाचा इतिहास आहे' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत नमूद करतो, "तेलासंबंधी इतके थरारनाट्य असताना मराठीत मात्र त्यावर पुस्तक नाही; म्हणून या पुस्तकाचा जन्म झाला." खरोखरच ही पुस्तके वाचताना आपण हे थरारनाट्य अनुभवतो. लेखकाचा या क्षेत्रातला अभ्यास आणि व्यासंग दांडगा आहे; आणि तो मांडण्याची त्यांची, नुसते मांडण्याची नाही; तर कारणपरंपरा उलगडवून दाखवून समजेल अशा सोप्या व रंजक शैलीत मांडण्याची, त्यांची खासियत आहे.

आशियातील पहिली तेल 'रिफायनरी' १८९२ साली भारतात सुरू झाली; तिची जन्मकथा 'हा तेल नावाचा इतिहास आहे' या पुस्तकात सांगितली आहे. मूळचा कॅनडाचा पण भारतात काम करणारा डब्ल्यू.एल्. लेक. आसाम रेल्वे ट्रेनिंग कंपनीचा इंजिनियर होता. तो मजुरांवर 'डिग बाय डिग' म्हणून सारखा ओरडत असे. खोदकामाचे सामान वाहून नेणार्‍या हत्तींचे पाय जास्तच तेलकट दिसतात, हे पाहून त्याने तेलविहीर खणली; आणि तिला या ओरडण्यामुळे 'दिग्बोई' हे नाव मिळाले. या भागात ८० विहिरी खोदल्या, पण खणण्यामागे शास्त्रीय दृष्टी नव्हती. पुढे 'बर्मा ऑइल कंपनीने' ही कंपनी ताब्यात घेतली. पण पुढे या गोष्टीला फारशी गती आली नाही. एक तर तेव्हा परकीय सत्ता होती; आणि मुख्य म्हणजे निसर्गानेच भारतभूमीत तेलसाठे रुजवले नाहीत.

पेनसिल्वेनियात दगडांच्या भेगातून चिकट, तेलकट उग्र वासाचा द्राव निघायचा. त्यावर टाकलेली जळती काडी जळत राहायची. प्रा. सिलिमनने त्या द्रावाचे पृथक्करण केले. १८५९च्या ऑगस्ट महिन्यात कर्नल एडविन ड्रेकने खणलेल्या विहिरीला तेल लागले. ही जगातली पहिली तेल विहीर!

जॉन विल्यम रॉकफेलरने 'स्टँडर्ड ऑईल' ही कंपनी सुरू केली. अनेक कंपन्या आपल्या नियंत्रणाखाली आणल्या. नुसते तेल काढून भागणार नव्हते. ते बाजारपेठेत पोहोचवणारी, विकणारी यंत्रणाही त्याने विकसित केली. प्रतिस्पर्ध्यांची कोंडी केली. विरोधकाने त्याच्यावर खटले भरले. शेवटी त्याला आपले तेलसाम्राज्य सोडावे लागले. 'नोबेल ग्रुप' आणि 'रायशिल्ड' या दोघांनी मिळून रॉकफेलरच्या 'स्टँडर्ड ऑईल'ला मागे रेटायचे ठरविले पण लुडविन नोबलचा अकाली मृत्यू झाला. मग रायशिल्डने मार्कुस सॅम्युएलशी संधान साधले; अतिपूर्वेचे देश व आशिया येथे मुसंडी मारायचे ठरविले. त्यांच्या बलाढ्य तेलकंपनीचे नाव 'शैल'. या कंपनीचा लोगोही शिंपल्याच्या आकाराचा! या कंपन्यांनी रॉकफेलरच्या साम्राज्याला धक्का देऊन त्याच्या नाकात दम आणला.

झिलेकरांनी जावा सुमात्रा येथे काम करून 'रॉयल डच' ही कंपनी काढली. जीन केस्कलरने झिलेकरांच्या मृत्यूनंतर या कंपनीसाठी काम केले. रॉयल डच, शेल ग्रुप आणि रायशिल्ड यांनी मिळून आता 'एशियाटिक पेट्रोलियम कंपनी' स्थापन केली.

असा सुरुवातीच्या काळातला इतिहास लेखकाने प्रथम मांडला आहे. २०व्या शतकात विज्ञान-तंत्रज्ञान या क्षेत्रात अनेक शोध लागले. डिझेलवर चालणारे इंजिन, नौका, ट्रक, विमान इ. ब्रिटन, जर्मनीने तेलावर चालणाऱ्या प्रचंड युद्धनौका बांधल्या. ब्रह्मदेशात तेलसाठे सापडायला लागले. हा देश ब्रिटिश आधिपत्याखाली होता. ब्रिटिशांनी शेल, रॉयलला डावलून 'बर्मा-ऑइल' कंपनी स्थापन केली; व हे तेलसाठे त्यांच्याकडे सोपवले.

पहिल्या महायुद्धात या तेलाने शस्त्र व यंत्र यात अमानुष ताकद फुंकली. या युद्धात भूभाग काबीज करण्यापेक्षा ऑईल टँकर बुडविणे, तेलविहिरी उद्ध्वस्त करणे. यावर भर दिला गेला. तेलापायी जर्मनीला पांढरे निशाण फडकवावे लागले. या युद्धाने नकाशावर नसलेले जॉर्डन, सीरिया, इराक, कुवेत सौदी अरेबिया असे नवे नवे देश जन्माला घातले. तेलाचे महत्त्व अनेकांना कळले. त्यांच्या नैसर्गिक संपत्तीवर पाश्चात्त्यांनी अफाट संपत्ती कमावली. आशियातला अत्यंत मागासलेला टोळीवाल्यांचा देश 'सौदी अरेबिया' याने भावी राजकारणाची दिशा ठरवली. अमेरिकेला सोन्याचे दिवस आले.

**'एका तेलियाने'** या पुस्तकात गिरीश कुबेरांनी प्रामुख्याने सौदी अरेबियाच्या तेलमंत्र्याची, शेख अहमद झाकी यामानी यांच्या कर्तृत्वाची कहाणी सांगितली आहे. २५ वर्षे त्यांनी तेलक्षेत्रात एकहाती भरीव कामगिरी केली. चलाख परकीय आणि अज्ञ स्वकीय दोघेही त्यांच्या विरोधात होते. अत्यंत मागासलेल्या देशात जन्माला येऊनही बड्या देशांना आपले म्हणणे ऐकायला लावण्याची परिस्थिती निर्माण करण्याची ताकद त्यांच्यात होती; आणि तीही हसतमुखाने, कोणतीही कटुता न आणता! त्यांचे वर्णन करताना लेखक म्हणतो, "तो काय बोलतो याच्यावर देशोदेशीच्या अर्थव्यवस्थांचा आलेख वरखाली व्हायचा. शेअरबाजारात उलथापालथ व्हायची; एखाद्या सम्राटासारखा राहायचा. स्वतःच्या विमानातून फिरायचा. ऐश्वर्यसंपन्न तरीही निरासक्त, सहिष्णू. यांच्याशी वाटाघाटी करायच्या म्हणजे अनेकांच्या पोटात गोळा यायचा. जे याला अमान्य ते पटवणं कठीण. आपल्या देशात पिकणारे तेल हे अस्त्र ठरू शकते, हे त्यांनी पहिल्यांदा ओळखलं आणि जगाची सगळी समीकरणंच बदलून टाकली."



अनुक्रमणिका

१) रॉयल डच 'शेल', २) स्टँटर्ड ऑईल ऑफ न्यू जर्सी म्हणजे आताची 'एक्झॉन', ३) 'ब्रिटिश पेट्रोलियम', तेव्हाची 'अँग्लोपर्शियन ऑईल कंपनी', ४) गल्फ, ५) टेक्साको, ६) स्टँडर्ड ऑईल ऑफ कॅलिफोर्निया म्हणजे आताची 'सोकाल', ७) स्टँडर्ड ऑईल ऑफ न्यूयॉर्क म्हणजे आताची 'मोबील'. 'सेव्हन सिस्टर्स' म्हणून ओळखला जाणारा हा सात कंपन्यांचा कंपू. तेलच काय, पण तेलवाहिन्या टँकर्स हेही त्यांनी आपापसांत वाटून घेतले.

इराणचे महंमद मोसादेघ यांनी "ब्रिटिश कंपन्या आपले शोषण करतायत." असे ठामपणे सांगायला सुरुवात केली. आपल्या देशातल्या साधनसंपत्तीसाठी, खनिज तेलासाठी बलाढ्यांशी टक्कर घेणारा, प्राणपणाने लढणारा हा पहिला नेता, पहिला 'तेलिया'. व्हेनेझुएलाचे गोमेझ, इजिप्तचे नासर आणि सौदीचे तारिकी यांनाही पाश्चात्त्यांच्या लुबाडणुकीचा राग होता. या कंपन्यांना धडा शिकवायची इच्छा होती. तारिकीनंतर यामानी तेलमंत्रिपदावर आले. हार्वर्ड विद्यापीठाचे ते पदवीधर होते. त्यांची 'लॉ फर्म' होती. कायदे, आंतरराष्ट्रीय व्यापार यावर ते वर्तमानपत्रातून लेख लिहीत. १९९० साली त्यांची तेलमंत्रीपदावरून अचानक उचलबांगडी झाली. त्यानंतर चार वर्षांनी त्यांनी 'सेंटर फॉर ग्लोबल एनर्जी स्टडीज' (G.E.S.) स्थापन केली. ऊर्जाक्षेत्राच्या समस्यांवर मार्ग काढायचा हा या संस्थेचा उद्देश. तिच्या चर्चासत्रात देशोदेशीचे ऊर्जामंत्री, तेलकंपन्यांचे प्रमुख सहभागी होतात. यामानी काय दिशा देतात, याकडे सर्वांचे लक्ष असते. त्यांच्या इशाऱ्यासरशी कोट्यावधींची गुंतवणूक केली जाते, अथवा काढून घेतली जाते.

राजे फैझल आणि तेलमंत्री यामानी यांची चांगली जोडी जमली. दोघांची एकमेकांना साथ होती, आणि विश्वास होता. यामानीने 'ओपेकला' (ऑर्गनायझेशन ऑफ अरब ऑईल प्रॉडक्शन कं.) प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. सुरुवातीला बड्या कंपन्या 'ओपेक'ला किंमतच द्यायच्या नाहीत. यामानींनी आम्कोच्या संचालकमंडळावर स्थान मिळवलं. 'ओपेक'च्या अधिकाऱ्यांना ते चर्चेसाठी घेऊन बसत. जेद्दाहमध्ये त्यांनी तेलउद्योगासाठी लागणारे प्रशिक्षण देणारे विद्यापीठ स्थापन केले. पुढे-मागे तेलउद्योग ताब्यात घेतला, तर अभियंते, प्रशिक्षक स्वदेशी हवेत म्हणून! याला अमेरिकेने विरोधच केला पण यामानींनी दुर्लक्ष केले.

इस्रायल युद्धानंतर अरब देशांना अमेरिकेचा खूप राग आला. इस्रायलने चार मुस्लिम देशांना लोळवलं. अमेरिकेची त्यांना मदत होती; म्हणून 'ओपेक'च्या बैठकीत अमेरिकेचा तेलपुरवठा बंद करावा, अशी मागणी झाली. पण यामानींनी नकार दिला. त्यामुळे उत्पन्नावर पाणी सोडायला लागेल; आणि मोठमोठे प्रकल्प सौदीत हाती घेतले होते, ते रखडतील. यावरून सीरियाने त्यांना ठार मारण्याची धमकी दिली, पण यामानी घाबरले नाहीत. उलट त्यांनी आपला दिनक्रम सांगितला; आणि टिपण्याची चांगली वेळ कोणती हेही सांगितलं.

'तेलास्त्र' हा यामानींनी पहिल्यांदा वापरलेला शब्द! पण हेही अस्त्र इतर अस्त्रांसारखेच केव्हा वापरायचे याचे भान ठेवायला हवे, असे ते म्हणायचे. देशांनी कोटा व भाव ठरवून घ्यावेत, व तेवढाच व्यवहार करावा. जास्तीची हाव धरू नये; तरच इंग्लंड, अमेरिकेची दादागिरी संपुष्टात येईल; असे त्यांनी सांगितले पण हे मागासलेले टोळीवाले देश, त्यांना हे पटेचना! 'ओपेक'च्या बैठकीत तेल नसलेले सीरिया, इजिप्त हे देश दादागिरी करायचे, म्हणून यामानींनी 'ओआपेक' (ऑर्गनायझेशन ऑफ अरब ऑईल प्रॉडक्शन एक्स्पोर्टिंग कंट्रिज) ही तेल असणाऱ्या देशांची वेगळी संघटना स्थापन केली.

लिबियाचे गडाफी यांनी सतेवर आल्याबरोबर भाववाढ मागितली नाही तर उत्पादन कमी करा, असे फर्मान काढले. मोठ्या कंपन्यांना हात लावण्यापेक्षा आपल्यावर अवलंबून असलेल्या छोट्या कंपन्यांची

नाकेबंदी करायचे गडाफी आणि यामानींने ठरवले. भाववाढीची मागणी मान्य केली नाही, तर उत्पादनाला कात्री लावायची; किंवा कंपनीला टाळा ठोकू असा दम द्यायचा. अशा एकेका कंपनीला त्यांनी सुतासारखे सरळ केले. सर्व तेल कंपन्यांनी एकत्र येऊन लढा द्यावा; असं ठरवलं पण अमेरिकन कंपन्यांच्या आडमुठेपणामुळे हे शक्य झाले नाही.

तेलसंपन्न देशांना तेलव्यवसायात सहभागी होण्याची संधी तेलकंपन्यांनी द्यायला हवी, असे यामानींनी आपल्या एका भाषणात सांगितलं. राष्ट्रीयीकरणाला तो उत्तम पर्याय होईल, असे त्यांना वाटे. सगळ्याच देशांनी राष्ट्रीयीकरण केले तर या कंपन्या इथे राहातील कशाला? पुन्हा गुंतवणूक करतील कशाला? शिवाय सगळ्याच देशांकडे तंत्रज्ञान, प्रशिक्षित कुशल अभियंते आणि कामगार कुठे आहेत? असा युक्तिवाद ते करत. "तुमच्या सरकारची दादागिरी व इतर देशांमधला थेट हस्तक्षेप, मी माझ्या देशापुरता होऊ देणार नाही."

तेलटंचाईत साठा करून ठेवलेले तेल कंपन्यांनी बाजारात आणले. साहजिकच तेलाचे भाव घसरले; मंदी आली. काहींनी तेलाच्या बदल्यात धान्य, पोलाद इ. घ्यायला सुरुवात केली. राजे फाहद यांच्यामुळे यामानींच्या स्वातंत्र्यावर गदा आली. त्यांनी यामानींना न विचारता भाववाढ केली. त्यांना व राजघराण्यातल्या लोकांना तेलाच्या पैशात रस होता; तेलकारणात नाही! तेलक्षेत्रावर डल्ला मारण्याचा धोका राजघराण्याकडून होऊ शकतो, हे यामानींनी ओळखले होते. राजे फाहदनी यामानींना डावलून इंग्लंड व अमेरिकेबरोबर जे दोन मोठे व्यवहार केले, त्या व्यवहारातून सरकारी तिजोरीत एक दमडीही जाणार नव्हती. यामानींनी अर्थात विरोध केला आणि ओपेकच्या बैठकीत फाहदने 'फॅक्स' करून तेलाचे भाव वाढवण्याचा आदेश दिला. ही भाववाढ यामानींना मान्य नव्हती. त्यांनी फाहदना सांगितले "या प्रस्तावावर मी सही करणार नाही. हा निर्णय तुमच्या सहीशिक्क्यांनी करावा." २९ ऑक्टो. १९८६ ला यामानींना तेलमंत्रिपदावरून दूर केले गेले. अर्थात, यामानी गेल्यावर फाहद यांच्या समस्या अधिकच वाढल्या. फाहदनंतर राजे अब्दुल्ला अधिकारी बनले. त्यांची कार्यपद्धत राजे फैझल यांच्यासारखीच होती, त्यांनी सन्मानाने यामानींना पुन्हा तेलमंत्रिपद देऊ केलं, पण यामानींनी ते स्वीकारलं नाही.

अशा या 'तेलियाची कहाणी' गिरीश कुबेरांनी लोकांना सांगितली आहे. त्यांच्या कर्तृत्वाची ओळख जगाला विशेषत: मराठी वाचकांना करून दिली आहे.

**'अधर्म युद्ध'** या २००९च्या पुस्तकात अरब देशांची, तिथल्या राजकारणाची ओळख वाचकांना लेखकाने करून दिली आहे. टोळ्याटोळ्यांनी राहाणारे हे लोक! आपल्या भूमीत नैसर्गिक साधनसंपत्ती आहे; याचा त्यांना गंधही नव्हता. ब्रिटिश सरकारने आपल्या साम्राज्याच्या मजबुतीसाठी या टोळ्यांना हाताशी धरले. २०व्या शतकात इस्लामच्या अतिशुद्ध रूपाचा कठोर आग्रह धरणारी धर्मसत्ता आणि धर्माचे हे रूप प्रमाण मानून, त्यानुसार कारभार करू पाहाणारी राजसत्ता अरेबियात उदयाला येत होती. इंग्लंड व विशेषत: अमेरिकेने त्यांना तेलव्यवहारातून श्रीमंत बनवले; आणि त्यांच्या कितीतरी पटीने या व्यवहारात नफा कमावला. या परकीय सत्तांचा रागराग करणाऱ्या राष्ट्रवादी राजसत्ताही नंतर उदयाला आल्या. त्यांना पैसा पुरवून शस्त्रसमृद्ध करून आपापसांत लढत ठेवण्याचा धूर्तपणाही या पाश्चात्त्य सत्तांनी केला. 'ब्रदरहुड' संघटनेला रक्ताची चटक लावणारा अल हुसैनी पोसला गेला. जमात-ए-इस्लामी या राजकीय व धार्मिक पक्षाची स्थापना झाली. शेख अहमद यासिन याने 'गाझा' परिसरातील 'पॅलेस्टिनी' ही विद्यार्थ्यांची संघटना बांधली. गुलाबुद्दीन हेकमत्यार हा दुष्ट टोळीवाला अमेरिकेचा लाडका होता. मुल्ला ओमर याने 'तालिबान' संघटना बांधली. ओसामा



अनुक्रमणिका

बिन लादेन याने दहशतवादाला आत्मघाताचे नवे धारदार परिमाण दिले; आणि आयमान अल् जवाहिरीच्या मदतीने 'अल् कायद्या'ची स्थापना केली. हमीद गुल हा अनेक जागतिक कटकारस्थानांचा खुनशी सूत्रधार होता. कुविख्यात दहशतवादी अबू निदल हा शस्त्रास्त्रांचा चोरटा व्यापारी होता. इराकचा सर्वेसर्वा सद्दाम हुसेन पुढे अमेरिकेचा कट्टर शत्रू बनला. या सर्वांना अमेरिकेने पोसले. ह्या विषवल्ली वाढवण्यात त्यांचा सिंहाचा वाटा होता पण पुढे याच व्यक्ती व संघटना अमेरिकेला डोईजड झाल्या. 'वर्ल्ड ट्रेड सेंटर' जमीनदोस्त केले; तेव्हा अमेरिका पार हादरून गेली. बूमरँगसारखी ही कृती त्यांच्यावर उलटली. आपापसांत लढत लावून देण्याच्या प्रयत्नांतून अमेरिकेने निर्मिलेल्या या संघटनांची माहितीही गिरीश कुबेर यांच्या 'अधर्म युद्ध' या पुस्तकात वाचायला मिळते.

युद्ध जीवांचे – **'जैविक व रासायनिक युद्धाचा संसर्गजन्य इतिहास'** हे ऑगस्ट २०१० मधले गिरीश कुबेर यांचे आणखी एक पुस्तक! पुण्यातल्या 'स्वाईन फ्लू'चा संदर्भ देत या पुस्तकाची सुरुवात होते. 'टॅमी फ्लू' औषधासाठी पुणेकर जंगजंग पछाडत होते पण इंग्लंडच्या डॉक्टरांनी मात्र या रोगाच्या पेशंटला ''गरम सूप व आठवडाभर आराम आणि ताप आलाच तर साधी तापाची गोळी घे'' असं सांगितलं आणि तो पेशंट बरा झाला. लायकीपेक्षा या औषधाला जास्त महत्त्व दिले गेले. ते औषध तयार करणारी कंपनी एकमेव होती. या कंपनीला जॉर्ज बुश यांचा वरदहस्त होता. ती कंपनी मालामाल झाली. यामागचे राजकारण आणि अर्थकारण लेखकाच्या डोळ्यांपुढून गेले. त्यातून या पुस्तकाचा जन्म झाला; अशी या पुस्तकाची जन्मकथाही लेखकाने सांगितली आहे. आर्थिक फायद्यासाठी विज्ञानाचे राजकीयीकरण कसे आणि कोण करते; हे सांगणारे मराठीतले हे पहिलेच पुस्तक!

आपल्याकडे 'बर्ड फ्लू', प्लेग, हगवण, काळपुळी इ. रोगांच्यामागे अशीच राजकारणे होती का? हा प्रश्न लेखकाला पडतो. माणसाच्या प्रगतीचा इतिहास हा माणसं मारायच्या नवनवीन साधनांच्या प्रगतीचा इतिहास आहे. शास्त्रातल्या नवनवीन शोधांनी मृत्यूवर मात करण्याचा मानवी बुद्धीचा प्रयत्न होता; आणि त्याचवेळी माणसांना कोणकोणत्या मार्गांनी मारता येईल; याचाही अथक शोध सुरू होता. अर्थात, या बाबतीत पाश्चात्त्य आघाडीवर होते. आपल्या तिसऱ्या जगातल्या देशांचा उपयोग त्यांनी गिनीपिग्जप्रमाणे विषप्रयोगासाठी केला.

अगदी प्राचीन काळीही रसायनांनी माणसं मारण्याची विद्या अवगत होती. फक्त ही रसायनं प्रयोगशाळेत तयार होत नसत; तर झाडं, पानं, फळं, फुलं, खनिजं इ. माध्यमांतून विषारी रसायनं बनवली जात. नदीचे पाणी विषारी करणे, आगी लावून विषारी वायू तयार करणे, आंधळं करणारा विषारी वायू शत्रूवर सोडणे, भर समुद्रात आगी लावून नौका त्यात वितळवणे इ. या रसायनांबरोबर जीवशास्त्रीय युद्धातही आपले पूर्वज तयार होते. विषारी बाण मारले जात. त्यामुळे हमखास 'गँगरीन' होई. अतिजहरी सापांनी भरलेली रांजणे शत्रूंच्या नौकेवर फेकत. रोग्यांची कलेवरे, प्लेगचे उंदीर फेकत, लेप्टोस्पायरोसिस तापाची साथ पसरवणे, समारंभ आखून देवी झालेल्या रुग्णाची पांघरुणे शत्रूंना भेट देत.

पहिल्या महायुद्धात जर्मनीने क्लोरिनचे सिलेंडर शत्रूपक्षावर सोडले. त्याचा पिवळसर हिरवा ढग तयार झाला. साडेसहा हजार सैनिक श्वासाला मोताद होऊन मेले. हा हल्ला होणार हे दोस्तराष्ट्रांना माहीत होतं, पण त्यावरचे उपाय माहीत नसल्याने सैनिक मेले.

डॉ. अँटनी डिल्गर हे जर्मन होते. ते काळपुळीचे जंतू घेऊन अमेरिकेला गेले. तेथे या रोगाची लागण केली. जर्मनांनी फॉस्जेनचा मारा केला. या वायूला रंगरूप नव्हते. २४ ते ४८ तासांनी त्याचा प्रभाव

जाणवायला लागायचा. ४८ तासांत मृत्यू ठरलेला! इंग्रजांनी मग या वायूचे बॉम्ब बनवून फेकायला सुरुवात केली. जर्मनीने आणखी एक पाऊल पुढे टाकले. त्यांनी 'मस्टर्ड गॅस'च्या बॉम्बचा वर्षाव केला. त्यातून चिकट, तेलकट द्रव बाहेर आला. ५-६ तासांत डोळ्यांत तीव्र वेदना सुरू व्हायच्या. ज्या अवयवाचा संपर्क याच्याशी येईल, तो अवयव सुजून टम्म फुगायचा. अंगावर फोड यायचे, स्वरयंत्र बंद व्हायचे, त्वचा पिवळी पडायची. हा जमिनीवर साठून राहायचा. रंगरूप नसल्याने कळायचा नाही. वर्षभर तसाच राहायचा.

पहिल्या महायुद्धात १ लाख १३ हजार टन रसायनं वापरली. १ कोटी ३० लाख लोक जायबंदी झाले. ९१ हजारांनी जीव गमावला. आपण ही रसायने वापरल्याचे पुरावे अनेक देशांनी नष्ट केले. या अमानुषतेला जबाबदार असणाऱ्यांवर कारवाई हायला हवी होती पण ही मालिका सुरू केली; त्या फ्रेटझ हेबर यांना नोबेल पारितोषिक दिलं गेलं.

अमेरिकेने मस्टर्ड गॅसपेक्षा अधिक शक्तिशाली नवरसायन विकसित केले. 'लेविसाइट' नावाचे! मानवी कातडी यामुळे उकडलेल्या बटाट्यासारखी निघायची. इंग्लंडने 'एम डिव्हाइस' हे नवं अस्त्र विकसित केलं. १५ सेकंदांत त्याच्या वाफांनी मुखवटा भेदला जायचा, तीव्र वेदना व्हायच्या, वेड लागल्याचे भास व्हायचे.

पहिल्या महायुद्धानंतर 'व्हर्सायचा करार' झाला. त्यात रसायनअस्त्रांचा वापर बेकायदेशीर ठरवण्यात आला. जर्मनीवर तर बंदीच घालण्यात आली पण देशांनी चलाखी केली. रसायनअस्त्र नाही म्हणजे संरक्षणसिद्धताच नाही, अशी ओरड केली. मग हळूहळू अटी सैल केल्या. अन्य देशांनी वापरली; तर त्याच भाषेत प्रत्युत्तर दिले जाईल. या अस्त्राच्या संशोधनावर आणि साठवून ठेवण्यावर बंदी नाही. यात सुधारणा केली तर चालेल. या अस्त्राने आपापल्या देशाला सज्ज ठेवलेच पाहिजे.

जर्मनीने 'नर्व्ह गॅस' तयार केला. यामुळे माणसांचे स्नायू आकुंचन पावत. सांधे आखडत. देहाचे मुटकुळे बने. या अस्त्राला त्यांनी 'सरीन' हे नाव दिले.

हिटलर क्रूर की जपानी राज्यकर्ते, असा प्रश्न पडावा; असे जपानी वागले! चीनवर त्यांनी सगळे प्रयोग केले. भूल न देता शस्त्रक्रिया करणे, उलटे टांगून मारणे, तहानेने तडफडून मारणे, हिमदंशाने एखादा अवयव किती वेळात बाद होतो, हे पाहण्यासाठी हिमवर्षावात फक्त हात बाहेर काढून बसवणे इ. कोंबड्या, बदकांना मारणारे, बाजरी, ज्वारीचे विषारी दाणे विमानातून टाकले, प्लेगचे जंतू टाकले. 'साथ प्रतिबंधक आणि जलशुद्धिकरण प्रयोगशाळा' असं नाव असणाऱ्या या प्रयोगशाळा! त्यांचे अंतरंग भयाण, विद्रूप, विकृत होते. कैद्यांवर रोगजंतू सोडायचे व ते कसे काम करतात; हे पाहण्यासाठी त्यांची शरीरे भूल न देता फाडणे, हातापायांची अदलाबदल करणे, नवरा-बायकोंपैकी एकाला गुप्तरोगाची लागण करून दुसरा कधी बळी पडतो हे पाहणे, रक्त वाहून गेल्यावर किती वेळात मरण येते हे पाहण्यासाठी मोठ्या जखमा करणे, चाकावर फिरवून मारणे इ. जनरल शिरो इशी हा जीवशास्त्रज्ञ या केंद्राचा प्रमुख होता. जपानी सम्राटांनी त्याला हवे ते करण्याची मुभा दिली. सगळा मामला गुप्त होता. नकाशावरही ती ठिकाणं दाखवली नव्हती. दुसऱ्या महायुद्धानंतर इशी अमेरिकेच्या ताब्यात होते. त्यांच्यावर खटला भरायला हवा होता, पण आपली ही जैवास्त्रे अमेरिकेला द्यायला ते तयार झाले, म्हणून अमेरिकेने त्यांना माफ केले.

दोस्तांच्या मनात हिटलरच्या रसायनशास्त्रांची जबर भीती होती. पण त्यांच्याकडे नक्की काय आहे; हे कोणालाच माहीत नव्हते. हिटलरलाही दोस्तांकडे काय आहे; हे माहीत नव्हते. भयानक संहारक; अरब दोस्तांकडे असतील त्याला जर्मनीला तोंड द्यावे लागेल या भीतीने त्याने दुसऱ्या महायुद्धात 'सरीन',

'टॅबून' सारखी महासंहारक अस्त्रे सोडली नाहीत. ब्रिटनने एक आख्खं बेट जंतुशास्त्रासाठी राखून ठेवलं होतं. त्यावर सर मॅरिस हॅंके यांनी काळपुळीचे जैवास्त्र तयार केले.

महायुद्धानंतर रशियाने न्यूरेंबर्गच्या न्यायालयात 'जंतुयुद्ध करणाऱ्या जर्मनशास्त्रज्ञांना देहदंडाची शिक्षा द्या' अशी मागणी केली, पण आपले पितळ उघडे पडेल म्हणून इंग्लंडने विरोध केला; आणि अमेरिकेने तर ७६० जर्मन वैज्ञानिकांना आश्रय दिला. रशियानेही असले अनेक प्रयत्न करून जर्मनीला रोखलं होतं. पण हे जंतू अज्ञातच राहिले; आणि श्रेय गेलं रशियाच्या झुंजार सैनिकांना!

अमेरिकेनेही जोमाने जैविक अस्त्रनिर्मिती केली. त्यात माणसे, प्राणी, झाडेझुडपेही कोळपून गेली. रसायनशास्त्र वापरून व्हिएतनामचे श्रीमंत जंगल जाळले. युद्धात आगी लावल्या. त्या चक्रीवादळासारख्या गोलगोल फिरून पुढे येत. सद्दाम हुसेनलाही त्यांनी ही अस्त्रं पुरवली, पण पुढे या अस्त्रांबद्दल त्याला दोषी धरून फाशी दिली. खरं तर ही अस्त्रे त्यांनी वापरूनही टाकली होती, हे अमेरिकेलाही माहीत होतेच.

नकळत टाचणीच्या डोक्याएवढा धातू टोचवून त्यातून विषबाधा करणे, सिगारेटमध्ये स्फोटक ठेवणे, किरणोत्सर्गी पदार्थातून विषबाधा, चेहऱ्यावर रसायनाचा मारा करून फुप्फुस बाधित करणे, 'मस्टर्ड गॅस'च्या साहाय्याने शरीरसंवेदना घालवणे, इच्छित व्यक्तीच्या मनावर ताबा मिळवणे. जननक्षमता नष्ट करणे इ. प्रकार रशियाने केले.

दुसऱ्या महायुद्धानंतर न वापरलेली अस्त्रं अनेक देशांनी समुद्रात बुडवली. काहींनी आपल्या; तर अमेरिकेने दुसऱ्याच्या!

सगळेच प्रयोग वाईट नव्हते. काही कीटकनाशके शेतीला फार उपयोगी आहेत. आपल्या आयुरारोग्यासाठीही ती महत्त्वाची होती, पण त्याच्या विकृत वापराने उत्पात झाले.

वेगवेगळे देश, त्यांच्या शास्त्रज्ञांची विकृत मानसिकता आणि त्यांच्या पाठीशी उभे राहणारे त्यांचे राज्यकर्ते कोणत्या थरापर्यंत पोहोचले याचे अंगावर शहारे आणणारे वर्णन या 'युद्धजीवांचे' या पुस्तकात वाचायला मिळते. त्यामानाने आपण त्यांच्यापेक्षा खूपच सुसंस्कृत व मानवतावादी ठरतो. आपल्याकडे अशी घृणास्पद कृत्ये ना शास्त्रज्ञांनी केली ना राज्यकर्त्यांनी! अर्थात त्यावेळी आपण पारतंत्र्यात होतो. आपल्याला गुलामगिरीत खितपत पडावे लागले होते, म्हणूनही असेल! किंवा आध्यात्मिक दृष्टीचा व संतांच्या शिकवणुकीचा पगडा आपल्यावर होता, म्हणूनही असेल! पण माणुसकीला काळिमा फासणारे प्रयोग कोणी केले नाहीत, हे सुदैवच होय!

या चारही पुस्तकांतून आपल्यापुढे एक अपरिचित विश्व उलगडत जाते. मराठी साहित्यात नवे असलेले विषय ह्या लेखकाने मराठी वाचकांना परिचित करून दिले. केवळ माहिती देणे असाही उद्देश या पुस्तकांचा नसावा; तर आपण अंतर्मुख होऊन विचारांना चालना देण्याचा उद्देश असावा. मानवी मनाचे विविध कंगोरे, पैलू या पुस्तकातून आपल्यापुढे येतात. प्रगत देशात आपल्या हातात सत्ता ठेवण्यासाठी, वाटेल त्या थराला जाऊन राजकारण खेळण्याची प्रवृत्ती कशी आहे; याचे जवळून दर्शन होते. अमेरिका, इंग्लंड, रशिया, जपान यांबाबत एकापेक्षा एक वरचढ आहेत, याचा प्रत्यय येतो.

तेलामुळे युद्धतंत्रात आमूलाग्र बदल झाले. तेलावर चालणारी विमाने, नौका, रणगाडे, ट्रक यामुळे युद्ध रणभूमीवर न थांबता देशांतर्गत दूर-दूर पोहोचू शकले. रसायनशास्त्र, जीवशास्त्रांमुळे ते सर्वसामान्यांचा व महानगरांचा बळी घेणारे ठरले. ज्यांचा अर्थाअर्थी या युद्धाशी कसला संबंध नाही, असे निरपराध हजारोंनी मारले गेले. जंगले नष्ट केली, तेलविहिरीना आगी



अनुक्रमणिका

लावल्या, तेलनौका बुडवल्या, साधनसंपत्तीचाही बळी या युद्धात दिला गेला. ते अधिक भयाण व भेसूर रूप धारण करणारे ठरले!

तेल असणारे देश व नसणारे देश यांच्यातील संघर्षही या पुस्तकातून वाचायला मिळतो. अडाणीपणाचा फायदा घेणारे धूर्त, कावेबाज पाश्चात्त्य, तर त्यांना रोखणारे मोसेदेघ, नासर, गडाफी, तारीकी, यामानी हे मुत्सद्दी दिसतात. माजलेल्या तेलकंपन्यांना वेसण घालण्याचा वकूब त्यांच्यात होता. त्यांनी तेलाचे अस्त्र बनवले.

लेखकाची भाषा सरळ-सोपी आहे. सांगण्याची पद्धत रंजक आहे. यामानींचे अपहरण तर एखाद्या रहस्यकथेला लाजवणारे आहे. पुढे काय, पुढे कायची उत्सुकता वाढविणारी वर्णने आहेत. 'एका तेलियाने' हे पुस्तक थोडेफार चरित्रात्मक अंगाने लिहिले. 'हा ऽ नावाचा इतिहास आहे' हे ऐतिहासिक अंगाने लिहिले पण बाकीचीही पुस्तके साहित्याच्या कुठल्याच प्रकारात बसवता येत नाहीत. तेल कुठे व कसे सापडले, दहशतवादाचा उगम कुठे व कसा झाला, कुणामुळे झाला हे वाचताना आपली कुतूहलपूर्ती सहज होते. जागतिक राजकीय साहित्यनिर्मितीला ती आवाहन देणारी आहेत.

एकंदर ही चारही पुस्तके मराठीतला अमूल्य ठेवा आहेत, मराठी वाचकांच्या ज्ञानकक्षा रुंदावणारी आहेत, याबद्दल शंका नाही! प्रत्येक पुस्तकात लेखकाचा दांडगा व्यासंग व अभ्यास जाणवतो.

***

**डॉ. वृंदा कौजलगीकर**
५०३, 'शुभम्' पांडुरंगवाडी,
मानपाडा रोड, जैन मंदिराजवळ,
डोंबिवली (पूर्व) ४२१२०१
दूरभाष : ०२५१-२४४०४९२
भ्रमणभाष : ९२२४२६१६७८





अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

# दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता — रणधीर शिंदे

प्रत्ययाचा स्पर्श असलेली समीक्षा — डॉ. नीलिमा गुंडी

**(म.सा.प. पुणेचा २०१४ चा रा. श्री. जोग पुरस्कारप्राप्त ग्रंथ)**

दिलीप पुरुषोत्तम चित्रे हे मराठी साहित्यक्षेत्रातील एक मान्यवर व्यक्तिमत्त्व होते. मर्ढेकरोत्तर काव्याचा विचार करता, ते एक आधुनिकतावादी महत्त्वपूर्ण कवी होते. त्यांनी बहुविध स्वरूपाचे लेखन केले असून, त्यांना साहित्याशिवाय इतरही कलाप्रकारांमध्ये स्वारस्य होते. ते मराठी व इंग्रजीमध्ये लेखन करणारे अनुवादक, कथाकार, प्रवासवर्णनकार, विचारवंत, समीक्षक, ललित लेखक, नाटककार, चित्रकार, जाहिरातपट कथाकार असे बहुपेडी व्यक्तिमत्त्व असलेले 'कवी' होते.

दि. पु. चित्रे यांच्याकडील गुणसंपदा ही त्यांच्या सर्वच लेखनात अर्करूपाने एकवटलेली आहे. त्यांना साहित्य अकादमीचे दोन पुरस्कार मिळाले होते. त्यांच्या 'एकूण कवितां'साठी त्यांना एक पुरस्कार मिळाला होता; आणि त्यांच्या 'सेज तुका' या अनुवादासाठीही पुरस्कार मिळाला होता. अशा या महत्त्वपूर्ण कवीच्या कवितेविषयीचा स्वतंत्र समीक्षाग्रंथ लिहिला जाणे, ही एक स्वागतार्ह घटना आहे. स्वत: दि.पु. चित्रे कवितेला सांस्कृतिक व्यवहाराचे मुख्य अंग मानत; आणि त्यांच्या अभिव्यक्तीचे मुख्य माध्यमही कविता हेच होते. त्यामुळे रणधीर शिंदे यांनी 'दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता' या समीक्षाग्रंथाद्वारे चित्रे यांच्या कवितांचा केलेला अभ्यास महत्त्वाचा ठरतो.

प्रस्तुत पुस्तकात सात प्रकरणांच्या माध्यमातून दिलीप चित्रे यांच्या कवितेचा शोध घेतला आहे. 'कवी आणि काव्यविषयक भूमिका' या पहिल्या प्रकरणात चित्रे यांचे वैयक्तिक जीवन, त्यांचे इतर लेखन आणि त्यांची समीक्षा यांच्या संदर्भात त्यांच्या कवितेचा विचार केला आहे. चित्रे यांनी ७५० कविता लिहिल्या आहेत. त्यांची कविता आणि त्यांचे जगणे यांचे नाते अतूट आहे. त्यामुळे या प्रकरणातून समोर येणारी माहिती व त्याद्वारे केलेली निरीक्षणे अभ्यासकांसाठी उपयुक्त ठरतात. चित्रे यांच्यावर बडोदा शहरामुळे लहानपणी आलेले प्रबोधनपर्वातील उदारमतवादी संस्कार, घरातून मिळालेले जातिधर्म-निरपेक्षतेचे बाळकडू, पुढे मुंबई शहरामुळे मिळालेले सांस्कृतिक अक्करमाशीपणाचे संस्कार यामुळे चित्रे यांचे व्यक्तिमत्त्व वेगळे घडले. त्यामुळे त्यांना, बहुमुखी अशा भारतीय परंपरेतील सत्त्व आणि आधुनिक विचार, डोळसपणे स्वीकारता आले. तसेच परदेश-वास्तव्याचा कालखंड हा त्यांच्यासाठी कलात्मक-साधनेला उपयुक्त असा विजनवास ठरला; असे शिंदे यांनी लक्षात आणून दिले आहे. तसेच चित्रे यांचा कवितेविषयीचा समग्रतावादी दृष्टिकोन आणि वाचकांच्या सर्जक उद्देशांना महत्त्व देण्याची भूमिका यावर देखील लेखकाने प्रकाशझोत टाकला आहे.

'स्त्रीपुरुष मीलन संवेदनविश्व' या दुसऱ्या प्रकरणात लेखकाने चित्रे यांच्यावरील अस्तित्ववादाचा प्रभाव लक्षात घेतला आहे. चित्रे यांच्या कवितेतील एक महत्त्वाचे आशयसूत्र म्हणजे 'स्त्री-पुरुष-मीलन संवेदनविश्व' होय. हे आशयसूत्र उलगडून दाखवताना लेखकाने चित्रे यांच्यावर प्रभाव असलेले अनेक सांस्कृतिक संदर्भ



अभ्यासले आहेत. त्यात पाश्चात्त्य विचारातील अस्तित्ववादाबरोबरच भारतीय काश्मिरी शैव तत्त्वज्ञानही अंतर्भूत आहे. अस्तित्वशोधासाठी कवी चित्रे जीवनातील केंद्रवर्ती अशा मीलनानुभवाकडे वळतात आणि दैहिक संवेदनेला महत्त्व देतात. त्यांच्या मीलनानुभावाशी अस्तित्वभान आणि मृत्युविषयक भान दोन्ही निगडित असतात; हा लेखकाचा निष्कर्ष आहे.

'महानगरीय संवेदन' या प्रकरणात चित्रे यांनी जगभर केलेला प्रवास, विविध महानगरांमध्ये केलेले वास्तव्य या अनुभवांमुळे कवितेत उमटलेले संवेदन लक्षात घेतले आहे. चित्रे यांच्या कवितेत महानगरीय संवेदनेचे जे कंगोरे जाणवतात त्यात गर्दीचे संवेदन, परात्मता, यांत्रिकता, बाजारूपणाची जाणीव, एकाकीपणा आणि हिंसेमुळे आलेली अस्वस्थता यांचा समावेश आहे. त्यांच्या भोपाळ येथील वास्तव्यात लिहिलेल्या कवितांना हिंदु-मुस्लिम दंग्यांची ऐतिहासिक पार्श्वभूमी आहे. धार्मिक दंगलीनंतर उरलेले सगळेच परागंदा झाले आहेत, असे कवीला वाटते. कवीचे हे संवेदन त्यातील निखळ मानवीय आर्ततेमुळे लक्षवेधी ठरते.

'कवीची विश्वात्मकता आणि स्थलांतरणे' या प्रकरणात लेखकाने देशीयता आणि वैश्विकता या संकल्पना परस्परविरोधी कशा नाहीत, हे पटवून दिले आहे. चित्रे यांना आधुनिक युरोपीय कलामाध्यमांविषयी वाटणारी आस्था, तेथील निसर्ग, तसेच भू-सांस्कृतिक बदलाबाबतचे संवेदन याविषयी लेखकाने सोदाहरण विवेचन केले आहे. चित्रे यांनी आफ्रिका, अमेरिका, युरोप या खंडात फिरण्याचा-कधीकधी वास्तव्याचा अनुभव घेतला होता. त्यांची 'भारतीयत्वा'ची संकल्पना, 'महाराष्ट्रीय अस्मिता' आणि त्यांना पर्यावरणातल्या प्रत्येक घटकासकट अस्तित्वाचे जाणवणारे मोल यांचा विचार प्रस्तुत प्रकरणात केला आहे.

'आत्मविश्वभान आणि मिथकसृष्टी' या प्रकरणात लेखकाने चित्रे यांच्या कवितांमध्ये येणाऱ्या भारतीय तसेच ग्रीक पुराणकथांचा त्यांच्या कवितांशी असणारा अन्योन्य संबंध लक्षात घेतला आहे. त्यांची कविता खंडोबा, विठोबा यांचे चित्रण 'इंप्रेशनिस्ट' अंगाने करते. त्यांच्या अनुभव घेण्याच्या रीतीवर काश्मिरी शैवसंप्रदायाचा प्रभाव आहे; त्यात 'शिवशक्ती' संकल्पनेला महत्त्व आहे. चित्रे यांच्यावर ज्ञानेश्वर आणि तुकाराम यांचा प्रभाव असला, तरीही त्यांची दैवतविषयक कविता मराठी संतकाव्याहून वेगळी आहे. त्यामागे एका आधुनिक कवीची जाणीव आहे. त्यांच्या कवितेमध्ये 'संशयभक्ती'ची भावना आहे; जी तुकारामांशी नाते सांगते. मात्र त्यांच्या कवितेतील वास्तव हे विसाव्या शतकातील आहे. त्यात माणसाला विघटित असे जगणे प्राप्त झाले आहे. मिथकांचा सर्जक वापर करून चित्र्यांनी वर्तमानकालीन जटिल वास्तव प्रत्ययकारीपणाने रेखाटले आहे. 'देवी' या मालिका कवितेतून त्यांनी शिवशक्तीची मैथुनक्रीडा आणि विश्वनिर्मिती व संहार हा रहस्यपूर्ण अनुभव यांची एकरूपता सुचवली आहे. त्यांच्या या प्रकारच्या कवितांमधून आत्मभान आणि विश्वभान यांचे सहअस्तित्व जाणवते, असा लेखकाचा निष्कर्ष आहे.

'काव्यभाषेतील सर्जकता आणि प्रतिमाविश्व' हे या पुस्तकातील सर्वांत मोठे प्रकरण आहे. लेखकाने चित्र्यांच्या शब्दकळेतील व्याकरणिक संरचना, भाषिक मोडतोड, अलंकरण, शैलीच्या लकबी, प्रतिमाविश्व यांचा सोदाहरण शोध घेताना अनेक कवितांचे मर्मग्राही रसग्रहणही केले आहे. चित्रे लयीचा सौंदर्यसर्जक वापर कसा करतात, ते यमकांच्या वापरातून प्रभावी नादावकाश कसा निर्माण करतात, (उदा. 'झल्लाळ' ही कविता) यांचा लेखकाने वेध घेतला आहे. तसेच त्यांच्या कवितेतील अभ्यस्त शब्दांचा वापर, नवे सामासिक शब्द, इंग्रजी शब्दांचा वापर, शब्दांच्या मांडणीचे आणि विरामाचे प्रयोग आदी घटकही लक्षात घेतले आहेत. चित्रे यांनी उपयोजिलेले अस्तित्ववादी लेखनतंत्रही लेखकाने लक्षात घेतले आहे. त्यांच्या कवितांमधील आदिप्रतिमा, दृक्प्रतिमा, सांगीतिक प्रतिमा आणि लैंगिक प्रतिमा यांचाही विचार केला आहे. चित्र्यांच्या रूपबंधाच्या मर्यादा सांगताना लेखकाने

कवीच्या शब्दसंघटनेचा पसरटपणा व गद्यप्राय विधानात्मकता यांचा निर्देश केला आहे.

उपसंहारात लेखकाने चित्रे यांच्या कवितांचे वेगळेपण आणि महत्त्व नेमकेपणे अधोरेखित केले आहे. अस्तित्वभान ही चित्रे यांच्या काव्याची प्रमुख प्रेरणा असून त्यांच्या कवितेतून परंपरा आणि नवतेचा डोळस आविष्कार घडतो, हा लेखकाचा निष्कर्ष अभ्यासातून ठाशीवपणे निघालेला आहे.

प्रस्तुत पुस्तकाचा चिकित्सकपणे विचार करताना एक महत्त्वाची त्रुटी जाणवते, ती म्हणजे दिलीप चित्रे यांच्या कवितांवरील आक्षेपांचा सविस्तर परामर्श घेणारे स्वतंत्र प्रकरण हवे होते, ते यात समाविष्ट नाही. काही ठिकाणी समीक्षेत आवश्यक तो काटेकोरपणा आलेला नाही. उदाहरणार्थ, " 'झल्लाळ' या कवितेत कवीने यमकाचा वापर केला आहे." हे लेखकाचे विधान मोघम स्वरूपाचे आहे. तेथे यमकाच्या विशिष्ट उपप्रकाराचा (उदा. 'झल्लाळ' मध्ये दामयमकाचा वापर) नेमका उल्लेख करणे गरजेचे होते. काही ठिकाणी शब्दाचे आकलन अपुरे वाटते. उदा. 'डोळ्यांची सत्ता' या शब्दप्रयोगाबाबत लिहिताना ते 'दृश्यविश्वावर, अस्तित्वावर डोळ्यांचा मालकी हक्क' हा अर्थ त्यातून सूचित झाल्याचे सांगतात. खरे तर येथे 'सत्ता' हा शब्द तत्त्वज्ञानातील अर्थाने (उदा. व्यावहारिकी सत्ता आणि पारमार्थिकी सत्ता) म्हणजे 'अस्तित्वाची पातळी' या अर्थाने आला आहे. 'डोळ्यांची सत्ता' यातून चित्र्यांचे ऐहिक पातळीवरील भान लक्षात येते. तसेच चित्र्यांच्या कवितांमध्ये आलेला संज्ञाप्रवाहाच्या तंत्राचा वापरही लेखकानें लक्षात घ्यायला हवा होता. अशा काही किरकोळ त्रुटी जाणवतात. मात्र पुस्तकाची जमेची बाजू भक्कम आहे.

या पुस्तकाचे वैशिष्ट्य म्हणजे, लेखकाच्या प्रबंधाला मिळालेले हे पुस्तकरूप आहे. त्यामुळे संदर्भसूची, विषयसूची यासकट प्रबंधलेखनाची, संशोधनाची शिस्त पाळून या पुस्तकाचे लेखन झालेले आहे. हे पुस्तक वाचताना लेखकाची अभ्यास करण्याची प्रामाणिक धडपड जाणवते, त्याचप्रमाणे स्वतःची समीक्षादृष्टीही जाणवते. चित्रे यांच्या कवितेकडे जाताना शिंदे यांनी विविध समीक्षाप्रणालींचे गरजेनुसार उपयोजन केले आहे. यात चरित्रात्मक, आदिबंधात्मक, भाषावैज्ञानिक आदी समीक्षाप्रणालींचा मार्मिकपणे केलेला वापर लक्षणीय आहे. तसेच चित्र्यांच्या कवितेशी समरस होण्यासाठी त्यांनी अस्तित्ववाद, अतिवास्तववाद, भारतीय तत्त्वज्ञान, अनेक कलाशाखा हे अभ्यासाचे प्रांत आत्मसात केले आहेत. लेखकाच्या आत्मप्रत्ययाच्या मजबूत पायावर ही समीक्षा उभी आहे. त्यामुळे यात समीक्षेच्या परिभाषेमुळे दुर्बोधपणा न येता लेखनाचे अर्थगांभीर्य कायम राहिले आहे. महत्त्वाचे म्हणजे लेखकाने चित्रे यांच्या कवितेचा शोध निकोप अशा खुल्या दृष्टीने घेतला आहे. चित्रे यांच्या कवितेत विश्वरहस्य जाणून घेण्याची ओढ आहे पण त्यांची ही ओढ पारंपरिक नाही. त्यामागे ऐंद्रिय संवेदनाला महत्त्व द्यायची वृत्ती आहे. अशावेळी 'अध्यात्म' या शब्दाचेच वावडे असणारा समीक्षक या कविनेचे रसग्रहण करू शकला नसता. शिंदे यांनी चित्र्यांचे हे आगळे अध्यात्म जाणून घेण्याचा प्रयत्न वैचारिक आणि भावनिक अशा दोन्ही पातळ्यांवर केला आहे. त्यांच्या समीक्षादृष्टीतील ही लवचीकता उल्लेखनीय आहे. तसेच दर्या प्रकाशनाने मुद्रण, मांडणी, मुखपृष्ठ आणि निर्मिती या सर्वच घटकांबाबत दर्जा सांभाळला आहे. वाचक आणि अभ्यासक या पुस्तकाचे स्वागतच करतील.

***

**'दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता',**
रणधीर शिंदे, दर्या प्रकाशन, पुणे, २०१३
*पृष्ठे :* २३०, *मूल्य :* रु. २५०/-

**डॉ. नीलिमा गुंडी**
३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ,
सुभाषनगर, गल्ली क्र. ५
पुणे ४११००२



अनुक्रमणिका

एक इतिहासगौरव (श्यामसुंदर मुळे लिखित)

## दादोजी कोंडदेव : खंडन आणि मंडन

– वा. ना. उत्पात

*[अखिल भारतीय मराठा विकास परिषदेने हे पुस्तक प्रकाशित केले आहे. त्यांचे अभिनंदन! इतिहासगौरव जपणे, हा इतिहासलेखनाचा एक उद्देश, सामाजिक ऐक्य टिकवून धरण्यासाठी, आहे. सर्वच थोर ऐतिहासिक व्यक्तींनी राज्य व समाजधारणेसाठीच कार्य केले होते. अशीच 'हंसक्षीर न्याय' दृष्टी इतिहास लेखनात असली पाहिजे. 'सत्यं ब्रूयात, प्रियं ब्रूयात, न ब्रूयात् सत्यमप्रियम्' याबरोबरच 'न ब्रूयात समाजैक्यघातकम्' अशी काळाची गरज आहे. जेम्स लेन सारख्या परकीयाला हे भान असण्याची शक्यता नाही. यापूर्वीही १९३५ च्या आसपास केव्हातरी झाशीची संग्रामदेवता महाराणी लक्ष्मीबाई यांचे चारित्र्यहनन करणारे नाटक 'फिलिप्स कॉक' याने लिहिले होते. अवघ्या एकोणवीस वर्षाच्या महाराणीने इंग्रजांच्या नाकी दम आणणारा पराक्रम केला होता. त्याला कमी लेखण्यासाठीच हे झाले होते. असे असले तरी, 'व्हिन्सेंट स्मिथ' ह्या कट्टर इंग्रजी इतिहासकाराने राणी लक्ष्मीबाईंच्या पराक्रमाबाबत कबुलीजबाब दिला आहे की,*
*– 'When she had been installed, she certainly proved herself to be a resolute, bitter enemy of British Government... She was the best and bravest of rebel leaders.'*

कोणाचे वाचायचे, ते आपणच ठरवायचे!

– *संपादक]*

अखिल भारतीय मराठा विकास परिषदेने प्रकाशित केलेले श्यामसुंदर मुळे यांचे पुस्तक वाचले. जेम्स लेन यांच्या 'मुस्लीम भारतातील हिंदु राजा शिवाजी' या इंग्रजी पुस्तकातील विधानामुळे महाराष्ट्रात असंतोषाची लाट उसळली. भांडारकर इन्स्टिट्यूटवर हल्ला झाला. पुण्यातील दादोजींचा पुतळा एका रात्रीत हलवला गेला. चौथीच्या इतिहासातील त्यासंबंधीचा मजकूर काढला गेला. अशा वादविवादाच्या काळात प्रक्षोभावर हळुवार फुंकर घालणारे बार्शीचे इतिहास अभ्यासक श्री. श्यामसुंदर मुळे यांनी 'लोकप्रभा', 'किस्त्रीम' वगैरे नियतकालिकांत जे अभ्यासपूर्ण लेख लिहिले व विधायक इतिहास लिहिला, त्या लेखांचे एकत्रित केलेले हे पुस्तक आहे. अखिल भारतीय मराठा विकास परिषदेने हे पुस्तक प्रकाशित केल्यामुळे त्यावर आक्षेप घेण्यासारखे काही नाही याची पावतीच मिळते.



जेम्स लेनचे पुस्तक ज्यांनी प्रकाशित केले, त्या ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेसला प्रदीप रावत, बाबासाहेब पुरंदरे, डॉ. जयसिंग पवार, निनाद बेडेकर, शिवदे, मोरे, मेहेंदळे यांनी पाठविलेले निषेधाचे पत्र व ऑक्सफर्ड प्रेसची क्षमायाचना या पुस्तकात आहे. शिवभक्त शिवचरित्रकार श्री. बाबासाहेब पुरंदरे यांचा जेम्स लेनचा धिक्कार करणारा लेखही या पुस्तकात आहे.

पहिले बाजीराव, समर्थ रामदास, संत ज्ञानेश्वर यांच्यावर लेखन करणाऱ्यांविषयी अखिल भारतीय मराठा विकास परिषद या संस्थेने महाराष्ट्राचे मुख्यमंत्री यांना लिहिलेले पत्रही या पुस्तकात आहे.

दादोजी कोंडदेव कोण होते? त्यांनी शिवाजी महाराजांच्या जीवनात कोणते कार्य केले? त्यांची कारभारी म्हणून योग्यता काय होती? याचे साधार विवेचन श्री. श्यामसुंदर मुळे यांनी केले आहे. प्रत्येक विधानाला त्यांनी पुरावा दिला आहे. उदा. शिवाजी महाराज सातव्या वर्षी बेंगलोरला गेले होते का? याबाबत त्यांनी सात विविध लेखकांचे व काही ऐतिहासिक

ग्रंथांचे आधार दिले आहेत. त्यावरून वयाच्या ७ व्या वर्षी म्हणजे १६३७ मध्ये शिवाजी महाराज बेंगलोरला गेले नव्हते, हे सिद्ध केले आहे.

शिवाजी महाराजांचा पहिला विवाह फलटणच्या सईवाईसाहेबांबरोबर १६ मे १६४० रोजी पुण्यात झाला. त्यावेळी शहाजीराजे उपस्थित नव्हते. विवाहाची सर्व जबाबदारी दादोजीनेच पार पाडली कारण दादोजी कोंडदेव १६३३ पासून पुणे जहागिरीचे कारभारी होते. याबाबतच्या सर्व आक्षेपांना श्यामसुंदर मुळे यांनी साधार व सडेतोड उत्तरे दिली आहेत.

डॉ. जयसिंग पवार यांनी त्यांच्या पूर्वीच्या पुस्तकात "दादोजी कोंडदेव हे शिवरायाचे गुरू होते." असे म्हटले होते, याचे स्मरण श्री. मुळे करून देतात. "जिजाबाईसारखी माता व दादोजी कोंडदेवांसारखा शिक्षक महाराजांना लाभल्यामुळे ---- महाराष्ट्राला थोर राजा लाभला." ह्या त्यांच्या विधानातच दादोजींची योग्यता स्पष्ट होते, असे श्री. मुळे यांनी म्हटले आहे.

श्यामसुंदर मुळे यांना उत्तर देणारा डॉ. जयसिंग पवार यांचा लेखही या पुस्तकात छापला आहे. वाचकांना दोन्ही बाजू कळाव्यात म्हणून मुळे यांनी नि:पक्षपातीपणे प्रतिपक्षाचेही म्हणणे छापले आहे; हे विशेष आहे.

न्या. माधव गोविंद रानडे यांच्या 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' या पुस्तकात ते लिहितात, "दादोजींनी काळजीने, ममतेने शिवाजीचे पालन केले व शिवाजी आपल्या आयुष्याचे थोर कर्तव्य सिद्धीला नेण्यास समर्थ होईल, अशा रीतीने त्याला वाढविले."

खुद्द सातारचे छत्रपती महाराज म्हणाले, "मागे दादोजी कोंडदेव हा लहानसाच ब्राह्मण झाला, पण त्याने जे न्यायनिवाडे केले; ते औरंगजेब बादशहासही वंद्य जाहले."

दादोजींची योग्यता सांगणाऱ्या अनेक पुराव्यांत शामसुंदर मुळे यांनी कृ. अ. केळुसकर या इतिहासकाराची अनेक अवतरणे देऊन दादोजी कोंडदेवांची योग्यता काय होती, हे स्पष्ट केले आहे.

'दादोजी कोंडदेव – शिवरायांचा मार्गदर्शक' या प्रकरणात दादोजी कोंडदेव कोण होते, याची ऐतिहासिक माहिती लेखकाने दिली आहे.

दादोजी कोंडदेव शिवरायांचे गुरू होते; याविषयी मुळे यांनी ज्या इतिहासकारांच्या साक्षी काढल्या आहेत त्यात सर्वश्री पांडुरंग बलकवडे, संजय सोनवणी, प्रा. रा. ज्ञा. गायकवाड, प्रा. बा. शं. सूर्यवंशी, प्रा. विलास पाटील, केळुस्कर, यांचे उतारे देऊन मुळे यांनी दादोजींचे ज्येष्ठत्व सिद्ध केले आहे. दादोजींची स्वामिनिष्ठा, भोसले घराण्याशी असलेला त्यांचा स्वामी-सेवक संबंध, जिजाबाईसंबंधी त्यांच्या मनात असलेला अपार आदर, त्याने केलेले न्यायनिवाडे, त्याच्या घराण्याचा इतिहास यांची इत्यंभूत व विस्तृत माहिती या पुस्तकात आहे. शामसुंदर मुळे यांनी त्यासाठी जे परिश्रम केले ते खरेच चकित करावयास लावणारे आहेत.

दादोजी कोंडदेवांचे एक अस्सल पत्र मुळे यांनी उद्‌धृत केले आहे. त्यात जिजाऊंचा उल्लेख पुढीलप्रमाणे आहे, "सौभाग्यवती मातुश्री जिजाऊसाहेब" यावरून दादोजींची जिजाऊसाहेबांबद्दल काय भावना होती हे कळते. जेम्स लेनला हे कळणे शक्य नाही.

अखिल भारतीय मराठा विकास परिषदेने हा ग्रंथ प्रकाशित केल्याने त्याला जातीयतेचा दुर्गंध येत नाही. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन!

***

**दादोजी कोंडदेव : खंडन आणि मंडन**
पृष्ठे : २४८, किंमत ८० रुपये फक्त.
**लेखक :** श्री. श्यामसुंदर द. मुळे, दत्तधाम, ३८८८ व, मुळे प्लॉट, सोलापूर रोड, मु. पो. बार्शी - ४१३४०१ (जि. सोलापूर) भ्रमणध्वनी : ८५५४८७४८९७
**प्रकाशक :** श्री. जगन्नाथ मनोहर चव्हाण
संघटनमंत्री : अ.भा. मराठा विकास परिषद
अ/२, मानसनगरी, छत्रपती शिवाजी चौक
तळेगाव, जी.एच. ४१०५०७ ता. मावळ,
जि. पुणे, भ्रमणध्वनी : ९८५०५४९१४६

**श्री. वा. ना. उत्पात**
पंढरपूर

# बहिरा जातवेदाचा - 'भैरवी' टीकाग्रंथ

– प्राचार्य डॉ. मधुसूदन बोपर्डीकर

संतश्रेष्ठ बहिरा जातवेद विरचित भागवत दशम स्कंदावरील आद्य मराठी टीका 'भैरवी' दि. २४ नोव्हेंबर १९९३ रोजी प्रकाशित झाली. मराठी साहित्य व संस्कृतीच्या इतिहासातील हा 'सोनियाचा दिनु' म्हणता येईल. आजपर्यंत हा ग्रंथ केवळ नावाने माहीत होता. कोणी इतिहासकार त्यातील दोन-चार ओव्या वानगीदाखल देत व तिथेच थांबत. आता मात्र हा ग्रंथ (२५,७४० ओव्या) शुद्ध व पूर्ण स्वरूपात उपलब्ध झाला आहे. माझे गुरुवर्य स्व. प्राचार्य डॉ. दत्तात्रेय गंगाधर कोपरकर (एम.ए.पीएच्.डी., वेदतीर्थ, पालितीर्थ) यांच्या अर्धशतकांच्या भगीरथ प्रयत्नांमुळे हा ग्रंथ साकार झाला.

१९२० साली कौटिलीय अर्थशास्त्र हजारो वर्षांच्या अज्ञातवासातून प्रकाशात आले होते, तसेच मोल या ग्रंथप्रकाशनाचे आहे.

### ग्रंथाचे स्वरूप

ग्रंथाची अभ्यासपूर्ण प्रस्तावना ५० पृष्ठांची असून, ९० अध्याय व २५,७०८ ओव्यांचा हा ग्रंथराज ९६४ पाने व्यापणारा आहे. त्यानंतर पाठभेद व शब्दसंग्रह (अर्थ व संदर्भासह) अशी १०० पानांची २ परिशिष्टे आहेत. मूळ भागवतातील दशमस्कंदाच्या ३९४४ श्लोकांवरील ही टीका आहे. अनेक हस्तलिखितांच्या तुलनात्मक अभ्यासातून ही चिकित्सक आवृत्ती तयार झाली आहे.

### जातवेदाचे चरित्र

घोगरगाव, ता. नेवासा, गोदावरी तीर, हे जातवेदाचे मूळ गाव आहे. तेथे उद्ध्वस्त स्थितीत एका गोसाव्याचा मठ आणि समाध्या आहेत. (स्व. सुरेश जोशी) बहिरा जातवेद हा एक अग्रहारी ब्राह्मण होता. त्याचे वडील कृष्ण (५९.४,५) तथा अनंत (१.७६) होते. मातुश्रीचे नाव अंबिका. (९०.२४७) त्याचे गोत्र कौंडिण्य (१.७६) होते. त्यांचे गुरू चिंतामणी (११.१३.६०.६३) यांचे वर्णन गणेशरूपात आले आहे. पद्मनाथ पंडित तथा गोपालदास, कृष्णनाथ, नृसिंहनंदन, जनार्दन ही जातवेदाची स्फूर्तिस्थाने असून कुलदेवता मोहिनीराज, अर्धनारीनटेश्वर आहे. 'परि न कळे नारी की नरू' (११-३१-८).

### कवीचे नाव

'जातानि वेद' म्हणजे जगात जन्मलेल्या सर्व गोष्टी जाणणारा सर्वज्ञ अशी यास्काने निरूक्तात (७.१९) 'जातवेद' शब्दाची व्युत्पत्ती दिली आहे पण 'जातवेद' हे त्याचे आडनाव मानले पाहिजे. 'जातवेदवंशीचा' [स्कंद ११ (३०-१८०)] असा उल्लेख येतो. बहिरंभटाच्या वेडेपणाच्या गोष्टी भक्तविजयात महिपती व इतर लेखक देतात. 'पिसापिसे' हे जोड आडनाव असावे. बहिरा जातवेद व बहिरापिसा एकच होते. (म.म.द.वा. पोतदार) आणखी एका बहिरंभटाचा निर्देश येतो.

### कालनिर्णय

इतिहासाचार्य राजवाडे सन १४७८-१५३८ हा काल सांगतात. श्री. ना. ब. जोशी ज्ञानेश्वरांनंतर १०० वर्षे हा (१३७८) हा काळ सांगतात. डॉ. पां. ना. कुलकर्णी १२८३-१३४८ हा काळ सांगतात. पांगारकर १४२८ हा काळ देतात. लीलावती नंतरचा ११४४-१२२३ असे डॉ. केतकर सांगतात. त्याशिवाय डॉ. प.



कृ. गोडे, यांनी चर्चा केली आहे. सारांश हेमाद्री, बोपदेव, चित्सुख, श्रीधर व जातवेद समकालीन असावेत. (इ.स. १२५०)

### खग्रास सूर्यग्रहण

इ.स. १२५३ मधील खग्रास सूर्यग्रहणाचा उल्लेख बहिरा करतो. (८२.१). या संदर्भात सांगलीचे ना.ग. देशपांडे, डॉ. जयंत नारळीकर, डॉ. कृ. दा. अभ्यंकर यांनीही चर्चा केली होती व १ मार्च १२५३, दु. ३.१६ वा. नगर जिल्ह्यात ग्रहण दिसले होते, असा निर्णय त्यांनी दिला होता. त्यामुळे इ.स. १२५३ हा काळ निश्चित ठरतो.

### कालनिर्णयाचा पुनर्विचार

या संदर्भात प्रा. ना. ग. देशपांडे, डॉ. अभ्यंकर, बंगलोरचे डॉ. कपूर यांनी खग्रास सूर्यग्रहणाविषयी चर्चा केली; व ग्रहणाचा सन १४६७ हे मान्य केले. त्यामुळे 'जातवेद' ज्ञानोत्तरकालीन ठरतो. ज्ञानेश्वरीचा काल इ.स. ११३४ म्हणजे शके १२१२ आहे.

### विषय व परिभाषा सूची

प्रस्तावनेच्या एकूण १० पानांमध्ये डॉ. कोपरकरांनी विषय व पारिभाषिक शब्दांची सूची दिली आहे. विषयामध्ये ग्रंथ व व्यक्ती, शक्तिदेवता, संगीत, वाद्ये, द्यूत, खाद्यपदार्थ, अलंकार (दागिने), वस्त्रे, वास्तुशास्त्र यांचा समावेश होतो. भैरवी टीकेतील संदर्भ सर्वत्र दिले आहेत.

दशम स्कंधाचा विषय ९० अध्यायांत आला असून, बालकृष्णाच्या लीला हा मध्यवर्ती विषय आहे. वसुदेव-देवकी विवाह, (१), कालियामर्दन (१६), रासक्रीडाशंकर रो (२९), कंसवध (४४), शिशुपालवध (७४), सुभद्राविवाह (८६) असे काही कथाभाग आहेत.

### 'भैरवी' टीकेच्या प्रती

(१) अ प्रत - अहमदनगर १९५३, (२) ब्र प्रत - बडोदा, (३) प प्रत - पैठण १९५४, (४) म प्रत - भारत इतिहास मंडळ, पुणे, (५) न प्रत - नागपूर १९५६, (६) औ - प्रत - मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद, एकूण ७ पानांत या सर्व प्रतींची माहिती आली आहे. काही हस्तलिखितांचे हस्ताक्षरही पाहावयास मिळते.

### एक आख्यायिका

एकदा जातवेदाने विनोदाने आपल्या पत्नीस विचारले – "आज भाजी अळणी का केली?" बायकोने उत्तर दिले – "आता साठी उलटली तुमची, खाण्यापेक्षा परमार्थाकडे का लक्ष देत नाही?" बहिरा बिथरला, काजीकडे जाऊन यवनधर्माची दीक्षा घेतली, पुढे पैठणच्या ब्राह्मणांनी शुद्ध करून घेतले. "मग मी हिंदू की यवन?" असे वेड्यासारखे विचारत तो भटकू लागला. म्हणून त्याला 'बहिरा पिसा' नाव पडले.

बहिराची नावे 'वहिरड, वहिरव, वहिरा (भैरव) व उपनाम जातवेद असल्याचे प्रा. श्री. मा. कुलकर्णी सांगतात. (१९५६)

### भैरवीचे असामान्यत्व

१) लेखनाआधीची चक्रधर शके (११९४-१२७४), भास्करभट्ट व्यास बोरीकर (१२७३) यांच्या भैरवी टीका आद्यतम आहे.
२) मराठीतील पहिले आख्यानक काव्य (डॉ. शं. गो. तुळपुळे)
३) भैरवीचा विस्तार रंजक आहे. (अ. ना. देशपांडे)
४) गेयता अपूर्व आहे.
५) यादवकालीन सुवर्णयुगाच्या शेवटच्या टप्प्यातील

सांस्कृतिक ज्ञानकोश.

६) काव्यालंकारांची रेलचेल.

७) मराठी आद्य मंगलाष्टके.

८) दशमस्कंद- दशमस्कंद (२५७०८) व एकादशस्कंद (८३५८) ओव्या प्राचीन कवीने केले नाही.

९) डॉ. ॲना फेल्डहाउस व डॉ. शं. गो. तुळपुळे आयोजित प्राचीन मराठी कोशासाठी ५६०० प्राचीन शब्द संदर्भ - अर्थासह (डॉ. कोपरकरांनी दिले, व आंतरराष्ट्रीय मान्यता मिळविली.)

१०) भैरवीमधील एकेका विषयावर पीएच्.डी. प्रबंध होऊ शकेल. शिवाजी विद्यापीठात असा एक प्रबंध मान्य. झाला आहे.

११) कृष्णभक्तांनी पारायण करण्यासारखा ग्रंथ.

१२) दासोपंत, एकनाथ व ज्ञानेश्वरांच्या पंगतीत बसणारा 'बहिरा जातवेद' आहे. (डॉ. शं. गो. तुळपुळे)

१३) भैरवीची अंधारमय साडेसाती साडेसातशे वर्षे टिकली व डॉ. कोपरकरांच्या प्रयत्नांनी तिला सूर्यप्रकाश दिसला.

१४) मराठी भाषा व संस्कृतीच्या अभ्यासकांसाठी एक नवे दालन खुले झाले.

**खंत**

एवढे ऐतिहासिक योगदान करणाऱ्या डॉ. कोपरकरांना 'भैरवी'साठी डी. लिट् पदवी मिळावी म्हणून खूप प्रयत्न झाले. निदान जन्मशताब्दीनिमित्त मरणोत्तर 'डी. लिट्.' त्यांना मिळावी एवढीच 'ईश्वरचरणी' प्रार्थना!

***

**प्राचार्य डॉ. मधुसूदन बोपर्डीकर**
अहमदनगर

**[संस्कृत पंडित कै. डॉ. द. गं. कोपरकर यांच्या जन्मशताब्दीपूर्ती (इ. ७-१२-१९१३ ते २०१३) निमित्त विशेष लेख.]**













# जात्यावरच्या ओव्या : एक स्वायत्त रूपबंध
(एक पुनर्गायन)

– सविता अशोक माळी

लोकसंस्कृती आणि स्त्री यांचे एक अतूट असे नाते आहे.

लोकगीतांच्या निर्मितीचे तीन टप्पे आहेत. त्यात बडबडगीते, खेळगीते हा पहिला टप्पा, उखाणे, आहाणे, हा दुसरा टप्पा आणि स्त्रियांची भावपूर्ण ओवीगीते हा तिसरा व अंतिम टप्पा होय. डॉ. ना. गो. नांदापूरकर यांनी ''ओवीचे मूळ खेळगीतात आणि उखाणे यांत आहे'' असे म्हटले आहे. ते म्हणतात, ''ओवीच्या उगमासंबंधी विचार करता दिसून येते की, म्हणी, आहाणे, उखाणे यांच्यावरून ती निघाली असावी. 'झाडझोपाळा, फळ गोपाळा,' झाडाला फूल नाही, फळाला आठोळी नाही', किंवा 'आठ आटांगण, बारा पटांगण, चार चौकडे, दोन आकोडे' अशांसारखे आहाणे कूट म्हणून आजही खेड्यापाड्यांत रूढ आहेत. ही रचना किंचित तालबद्ध आणि यमकानुप्रासयुक्त. तेव्हा या नादमाधुर्याच्या 'नादाने' यमकानुप्रासप्रियतेवरून, अंत्य यमकाच्या मराठी वैशिष्ट्यावरून, आणि म्हणी, आहाणे, उखाणे यांच्या विपुल उपयोगावरून असे अनुमान करण्यास सबळ जागा आहे की, स्त्रियांनी यातील नादमयता स्वीकारून त्यात भावनांना व्यवस्थित रूप देऊन, आपल्या ऊर्मी प्रकट करण्याचे साधन अशी ही ओवी निर्माण केली.''

म्हणी-उखाण्यातून निर्माण झालेली ओवी ही स्त्रियांची निर्मिती आहे. जात्यावरच्या ओवीत स्त्रिया जीवनात आलेले अनुभव मनापासून गातात. त्यामुळे त्या भावपूर्ण असतात. त्यांत कुटुंबातील निरनिराळ्या व्यक्तींच्या भावसंबंधांचे अत्यंत हळुवारपणे केलेले चित्रण असते. संसारातील सुख-दु:खाचा प्रामाणिक आणि उत्कट आविष्कार असतो. ओवीगीते स्वायत्त व भावसंपन्न असतात.

जात्यावरच्या ओव्यांचे एक महत्त्वाचे लक्षण म्हणजे 'गाथा' ज्याप्रमाणे स्वयंपूर्ण आशयाची असते; त्याचप्रमाणे ओवीदेखील अर्थाच्या दृष्टीने संपूर्ण असते. हा आशय कळण्यासाठी दुसऱ्या कोणत्याही बाह्य संदर्भाची आवश्यकता नसते. ओवीचा आशय स्वयंपूर्ण व स्वतंत्र असतो. त्यामुळे प्रत्येक ओवीला स्वत:चे असे स्वायत्त अस्तित्व असते. ज्याप्रमाणे लोककथांतील कल्पनाबंध हे कथेचे एक स्वतंत्र 'एकक' असते, त्याप्रमाणे ओवीदेखील स्वतंत्रपणे, सुटीसुटी 'एकका'च्या स्वरुपात, एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे साहचर्यामुळे हस्तांतरित होते; आणि प्रवाही होत असते.

परंपरेने आलेल्या ओवीगीतांमध्ये शब्दांवर स्वरांचे अधिपत्य असते. स्वरप्रधानता हे त्यांचे प्रमुख लक्षण असते. लयप्रधान रचना हे तिचे रूप असते. ओवीतील शब्द गेयरूपाच्या सोयींनुसार, सहज व स्वाभाविकपणे, योजले जातात. गाणारी स्त्री शब्दांची जाणीवपूर्वक निवड करीत नाही; किंवा ती शब्द राबवीत नाही. ओवीच्या गेय स्वरुपाला साजेल अशा शब्दांची निवड सहजपणे करते. येथे रचनेचा खटाटोप नसतो. थोडक्यात, ओवीतील शब्दांच्या संदर्भात ग्रांथिक भाषेत जो काटेकोरपणा असतो, मौखिक ओवीत मात्र शब्दांचे वळण, उच्चार, जोडणी यात शैथिल्य असते. कारण ओवी गाताना रचनासौंदर्याकडे लक्ष नसते. कोणी ऐकावे म्हणून ती स्त्री गात नसते, तर आंतरिक ऊर्मीतून सहजपणे



अनुक्रमणिका

साकारलेले ते गीत असते. अजाणीवपूर्वक निर्माण झालेली ओवीगीते आशयसंपन्न आहेत. त्यातून झालेल्या भावनाविष्काराची मोहिनी आजही मराठी रसिकाच्या मनावर आहे.

कोणत्याही प्रदेशातील लोकवाङ्मयात स्त्रीगीतांचे दालन समृद्ध आहे. जीवनातील अनेक प्रसंगांचे वर्णन ओवीगीतात असते. कुटुंबातील निरनिराळ्या व्यक्तींच्या केलेल्या हळुवार चित्रणामुळे ही गीते भावपूर्ण होतात. यात सुख-दुःखांचे प्रामणिक असे वास्तवचित्रण असते. कुठेही रचनेसाठी खटाटोप केला जात नाही. "स्त्रियांच्या जीवनातील कल्पनाविलास, रचनाचातुर्य आणि वर्णनशैली यामुळे ती वाङ्मयीनदृष्ट्या महत्त्वाची ठरली आहे. काव्यात भावनाविलास महत्त्वाचा असला, तरी कल्पनाविलास आणि रचनाचातुर्यही तितकेच महत्त्वाचे असते. भावनेची मांडणी नीटनेटकी आणि वेगवेगळ्या परीने झाली की, ती आल्हाददायक वाटते. तिच्यात काव्य येते. एकच वस्तू किंवा भावना, निरनिराळ्या स्वरुपात नि परिवेषात प्रकट झाली की, तिच्यात पृथगात्मता येते." आंतरिक ऊर्मीतून आलेल्या भावनांचा सहजपणे झालेला स्वायत्त उद्रेक असेच ओवीगीतांबद्दलही म्हणता येईल.

ओवीगीतांत अनेकविध विषय हाताळले जातात. कुटुंबातील व्यक्तींबरोबरच देवादिकांविषयीही स्त्रिया ओव्या गातात. रामायणातील सीतेचा वनवास, लवांकुशाचा जन्म, रावणाचा अधमपणा, मंदोदरीची निष्ठा इ. प्रसंग तसेच कृष्णाचा जन्म, त्याच्या खोड्या, राधा-कृष्ण संबंध इ. विषय त्यांच्या आवडीचे आहेत. स्त्रियांच्या या ओव्यांचे आशयाच्या दृष्टीने पाच वर्ग करता येतात. ते पूर्ण स्वायत्त आहेत.

१) नातेसंबंधांवर आधारित ओव्या. (आई, वडील, भाऊ, बहीण, बाळ इ.)
२) देवदेवतांसंबंधीच्या व साधुपीरांसंबंधीच्या ओव्या.
३) वारकरी संप्रदायाच्या प्रभावाच्या निदर्शक ओव्या. (पंढरी, चंद्रभागा इ.)
४) पौराणिक कथांवर आधारित ओव्या.
५) व्यावहारिक, सामाजिक आशयाच्या संकीर्ण ओव्या.

परंपरेने चालत आलेल्या ओव्यांमध्ये जास्तीत जास्त ओव्या या नात्यांतील व्यक्तींशी असलेले भावसंबंध व्यक्त करणाऱ्या आहेत. बालपण घालविलेले माहेर स्त्रीला अधिक जवळचे वाटते. माहेरी अनेक व्यक्तींशी विकसित झालेले दृढ भावसंबंध स्त्रियांच्या मनात खोलवर रुजलेले असल्याने लग्नानंतर प्रत्येक ठिकाणी तिला माहेर, माहेरातील व्यक्ती यांची आठवण येते. सासरची माणसे आणि माहेरची माणसे यांच्या प्रेमातील तफावत तिला जाणवते. आईविषयीची आत्मीयता, जिव्हाळा, तिच्यासंबंधी असलेला आदर, अभिमान हे भाव जात्यावर गात असताना अत्यंत उत्कटतेने व्यक्त होतात. वडिलांविषयीचे प्रेम व भावंडांविषयी ती फार उत्कटतेने बोलते. मनात दाटलेल्या माहेरच्या आठवणी, माहेरच्या माणसांसंबंधीची ओढ आणि त्यांच्याविषयीची अनावर भावना यांना ओव्यांमधून वाट मोकळी करून देते.

सासुरवाशिणीला अनेक बंधने असत. कोणाशी मनमोकळेपणाने बोलण्याचेही स्वातंत्र्य तिला नसे. चार भिंतींत तिची होणारी घुसमट, कुटुंबात असणारे दुय्यम स्थान, यामुळे तिचे मन अस्वस्थ होते. तेव्हा तिला माहेरी असणारे मोकळे वातावरण आणि श्रीमंती यांची आठवण येते. याचे दर्शन पुढील ओवीतून होते. आपल्या बापाच्या मनाची श्रीमंती आणि बापाचे नाव आपल्या भावाने राखावे; अशी बहिणीची अपेक्षा आहे.

*माझ्या ग माहेरात, सदा उघडे ते दार*
*आल्या गेल्या पाहुणचार, होत असे.*
*वाटेवरचं घरदार, आल्या गेल्याला ताकभात*
*भल्या बापाचं नाव राख, भाऊराया.*

सासर कितीही चांगलं असलं तरी; तिथे मुलगी



अनुक्रमणिका

आणि सून यांच्यात भेद हा केला जातोच. अशावेळी तिला क्षणोक्षणी आपल्या आईची आठवण येते. आईने केलेल्या उपकाराचे, तिच्या प्रेमाचे सतत स्मरण होते.

*नऊ मास ओझं, वागविता नाही भ्याली,*
*मायबाई माझी, शिकविता कष्टी झाली ।*

*मांडीचा चवरंग, नेतराचा केला दिवा*
*उपकार फेडू कवा, मायबाई ।*

सासरी भोगाव्या लागणाऱ्या सासुरवासामुळेच तिला वाटते,

*लेकीच्या जन्माला नको घालू देवराया ।*
*मायबाईची माया फुकुट जाती वाया ।*

*लेकीचा जन्म असा बाभळीचा पाला ।*
*वावटळीने नेला धनी कोण कुणाचा झाला ।*

*अस्तुरीचा जन्म नको घालू श्रीहरी ।*
*संसारी येऊन परायाची ताबेदारी ।*

सगळ्याच मुलींना सासुरवास असतो, असे नाही. अपवादाने एखाद्या मुलीला सासर चांगले मिळाले, सासरच्या लोकांनी तिच्या रूपागुणांचे कौतुक केले, तर "लेकीने नशीब काढले" असे म्हणतात. लेकदेखील अशा चांगल्या सासू-सासऱ्यांचे दळण दळताना ओवीच्या माध्यमातून कौतुक गाते. स्वत:च्या सुखाबद्दल समाधान व्यक्त करते.

*सूर्य नारायणा तुम्ही सुखाचे उगवा ।*
*कुंकवाला माझ्या शेला पदरी वागवा ।*

जात्याशी संवाद साधताना, तिला आपले दु:ख हलके हलके वाटायला लागते. तेव्हा 'जाते' तिला ईश्वराप्रमाणे वाटते, सखासोबती वाटते. 'जात्या ईश्वराशी' संवाद साधल्याने ती सुखावते.

*जात्या ईश्वरा, कोण्या डोंगरीचा ऋषी*
*बहिणीवानी हुरद उकलीते तुज्यापाशी ।*

बहीण-भाऊ हे एक पवित्र नातं. प्रत्येक बहिणीला आपल्या भावाविषयी प्रेम व आपुलकी वाटत असते. सासरी गेल्यावर तर लहानपणापासूनच्या आठवणींचा पूर येतो. लग्न झाल्यानंतर बहिणीला आणायला जाणारा, तिच्या संरक्षणाची जबाबदारी घेणारा भाऊ हा तिचा आधार असतो. माहेराला नेणारा 'मुऱ्हाळी' म्हणून त्याच्याविषयी तिला विशेष आत्मीयता वाटत असते. सण-उत्सवाला तो येईल आणि माहेरी घेऊन जाईल; म्हणून ती आतुरतेने भावाची वाट बघते.

*पूर ओसरले, नदी नाले शांत झाले.*
*अजून का न भाई आले, बहिणीसाठी ।*

*नवरात्र गेले, दसरा दूर गेला*
*न्यायला का न आला भाईराजा ।*

*तुला आळवीत, बसले मी दारात*
*काय वयनीच्या नादा, गुंतलासी ।*

*बहिणीला भाऊ, एकतरी ग असावा*
*पावल्याचा खण, एका रातीचा विसावा ।*

भाऊ व माहेरची माणसं सुखी असलेली पाहून तिला समाधान वाटते पण भावजय आल्यानंतर आपल्या बहीण-भावाच्या प्रेमात वाटेकरी आल्याचे दु:खही तिला वाटते. हाही स्वायत्त भावच!

*भाऊ करता करता, डोळा आलं पाणी*
*परायी नार येता, भाऊ झाला लोकावानी ।*

त्यातच भावाला जर लेक झाली तर भावाचे प्रेम कमी होतेय, असे बहिणीला वाटते. ती म्हणते,

*वळवाचा पाऊस, पडून ओसरला ।*
*भावाला झाल्या लेकी, बहीण विसरला ।*

बहिणीचे भावावरील प्रेम कायम असते. ती आपल्या भावाच्या रूपाचे, गुणांचे वर्णन करते.

त्याच्या श्रीमंतीचे नुसते गोडवे गात नाही, तर त्याच्याबद्दल अभिमानही बाळगते. निसर्गातील प्रतिमा वापरून त्याच्याविषयीचा भावनाविष्कार करते.

*सावली पाहुनी मी गं उतरिते वझं ।*
*सावळा बंधुराज झाड विसाव्याचं माझं ।*
*दूध आलं ऊतू त्याला पाणी छाया करी ।*
*भाऊराया माझा तसं माझं मन धरी ।*

कुंकवाच्या धन्याला ती जिवापाड जपते. ती त्याला देवरूप देते.

*शेजंबाजंवरी । भर्तार देवरूप ।*
*नेनंती बाई माझी । इसरली मायबाप ।*
*माझ्या ग अंगणात सूर्या किरनाचं एक झाडं*
*हावशा माजा कांत झाला उशीर सबा सोड.*

नवऱ्याला देवरूप देणारी पतिव्रता नवरा जेव्हा वाईट वर्तन करतो किंवा सवत आणतो किंवा बाहेरख्याली असेल; तर मात्र ती पतिव्रता ओवी-गीतातून अंगार ओकते.

*रागीट भरतार बच्चा नागाचा फुत्कार ।*
*भरताराचा राग जसा वारूळीचा नाग ।*

ओवीगीतांतून सासरा, दीर, नणंद, मावशी व मामा अशा विविध नात्यांसंबंधीचे चित्रण झाले आहे.

जात्यावर बसताना सर्वप्रथम ती देवाचे नाव घेते.

*पहिली माझी ओवी, मी गाईली एकाला*
*दशरथ लेकाला, रामरायाला ।*
*दुसरी माझी ओवी, दुसरा माझा नेम*
*तुळशीखाली राम, पोथी वाची ।...*
*...दहावी माझी ओवी, दशांगुळ गाईन*
*मी लक्ष्मी होईल, संवसारी ।*
*...विसावी माझी ओवी, विसाला खुंटली*
*साक्षात भेटली, अंबाबाई ।...*

वारकरी संप्रदायाच्या शेतकरी कुटुंबावरील प्रभावाच्या ओव्याही पाहायला मिळतात. वारकरी संप्रदायाची बीजं समाजमनावर अगदी खोलवर रुजली आहेत.

*इठ्ठल माझा पिता, रुक्मीण माझी आई,*
*बंधु पुंडलिक, भीमा माझी भावजय*
*पंढरपुर माझं माहेर साजणी ।*
*इठ्ठल रखुमाई नामदेवाची ग जनी ।*

अशा कितीतरी ओव्यांतून स्त्रीमनावर असलेला विठ्ठलाचा प्रभाव दिसतो.

ओवीगीतांचे वाङ्मयीन मूल्य आजही टिकून आहे. त्याचबरोबर या गीतांतून रूढी-परंपरा, नातेसंबंध, रीति-रिवाज व बोलीभाषा या सर्वांचे दर्शन घडते. एका दृष्टीने ही लोकगीते तेथील लोकजीवनाचे, पर्यायाने लोकसंस्कृतीचे दर्शन घडवितात.

**संदर्भग्रंथ :**


१) मौखिक वाङ्मयाची परंपरा स्वरूप आणि भवितव्य – प्रभाकर मांडे
२) लोकपरंपरा आणि लोकप्रतिभा – डॉ. तारा भवाळकर
३) लोकसाहित्याचे अंत:प्रवाह – प्रभाकर मांडे
४) लोकसाहित्याचे स्वरूप – प्रभाकर मांडे


***


**सविता अशोक माळी**
चलभाष - ९७६६४५८४७६
पत्ता - श्री. दशरथ राजाराम देशिंगे
मु. पो. शिंदेवाडी (हिंगणगाव)
ता. - कवठेमहांकाळ.
जि. सांगली
पिन - ४१६४०५

# ग्रामीण बोलीचा शब्दकोश — द. ता भोसले

– डॉ. रामन जाधव

माणसाची खरी ओळख त्याच्या बोलीभाषेतून होते. बोलीभाषेतूनच त्याचा व्यवसाय, जात, प्रांत, देश या सर्व घटकांची ओळख होते. अशी 'बोली' बोलणारा समूह मोठा असतो. तो निसर्गाशी निगडित असतो. तो आपल्या बोलीतूनच त्याचा जीवन व्यवहार पार पाडीत असतो. अशा बोलीला समृद्ध परंपरा असते. प्राकृत, अपभ्रंशी, मागधी, अर्धमागधी, अशी महाराष्ट्री परंपरा आहे. समाजप्रबोधनासाठी संत ज्ञानेश्वर, संत तुकारामांनी बोलीभाषेचा वापर केला. संतांनी मराठी बोलीला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. सृजनाच्या अत्युच्च पातळीवर तिला नेले. महानुभाव पंथाने तिचे सौंदर्य जगासमोर आणले. लावणी, पोवाडे, लोकनाट्य हे सर्व बोलीभाषेतूनच लोकांसमोर आले. लोकजीवन समृद्ध करणाऱ्या बोलीभाषा हळूहळू नष्ट होऊ पाहात आहेत. जागतिकीकरणाने ही प्रक्रिया आणखी गतिमान झाली आहे. जागतिकीकरणाने माणसाचे जगण्याचे संदर्भ जसे बदलले; तसे भाषेचेही बदलले. आज मोठ्या प्रमाणात इंग्रजी भाषेचा प्रभाव मराठी भाषेवर पडत आहे. खेडोपाडी आज इंग्रजी शाळांचे पेव फुटले आहे. आज खेड्यातही इंग्रजीविषयी कमालीचे आकर्षण, वाढू लागले आहे. या जागतिकीकरणाच्या रेट्यात मराठी भाषेचे भवितव्य काय? मराठी भाषा जगणार की मरणार? असा वाद-विवाद होत आहे. कधी नाही एवढी मराठी भाषेच्या भवितव्याची चर्चा होत आहे. याच काळात डॉ. द.ता. भोसले यांचा ग्रामीण बोलीचा शब्दकोश हा ग्रंथ, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई यांच्याकडून प्रसिद्ध झाला आहे. आत्तापर्यंत मराठी भाषेचे अनेक शब्दकोश प्रसिद्ध झाले आहेत पण शब्दाच्या मुळाशी असणारा अर्थ, त्याची उत्पत्ती, तो शब्द कोणत्या भाषेमधून मराठीत आला, त्याचा इतिहास काय आहे? सध्या तो व्यवहारात कोणत्या रूपाने वापरला जातो? या शब्दामागे समाजमनाची धारणा काय आहे? अशा अनेक अंगांनी लेखकाने शब्दांकडे पाहिले आहे. हे या ग्रंथाचे वेगळेपण आहे. शब्दकोशनिर्मिती करणे म्हणजे अपार मेहनत. अभ्यासात सातत्य, चिंतन व भाषेविषयी जातिवंत कळवळा असल्याशिवाय अशा ग्रंथाची निर्मिती होत नाही. लेखकाचे भाषेविषयीचे चिंतन त्यांच्या मनोगतात पाहावयास मिळते.



भाषा सशक्त, समर्थ व्हायची असेल तर सर्वांकडून सातत्याने, जाणीवपूर्वक वापरली गेली पाहिजे. ज्ञानभाषा म्हणून तिचा उपयोग समाजाला करता आला पाहिजे. त्यासाठी शब्दभांडाराची विपुलता हवी. शिवाय भाषेत लवचिकता असायला हवी. बोलणाऱ्याकडे भाषेविषयीची अस्मिता आणि आत्मीयता असायला हवी. जाणीवपूर्वक व सातत्याने साहित्याची निर्मिती व्हायला हवी. परकीय भाषेतील उत्तम अशा ग्रंथांचा अनुवाद व्हायला हवा. नवीन तंत्रज्ञानाचा भाषाविकासासाठी उपयोग व्हायला हवा. लेखकाच्या या चिंतनातून भाषेविषयी कळवळा व्यक्त होतो. ग्रामीण बोलीतील अनेक शब्द कमालीचे अर्थवाही, रसरशीत, अचूक अर्थच्छटा व्यक्त करणारे आणि खास अंगभूत सामर्थ्य प्राप्त झालेले असूनही ते झपाट्याने लोप पावत आहेत. मराठी भाषेविषयीची ही खंत लेखकाने व्यक्त केली आहे. बोलीतील अनेक शब्द तरुण पिढीला माहीत नाहीत. बोलीतील हे शब्द 'मातीत गाडल्या गेलेल्या सुवर्णमुद्राच' आहेत. त्यांचा वापर होणे



अनुक्रमणिका

गरजेचे आहे. या भूमिकेतूनच लेखकाने या ग्रंथाची निर्मिती केली आहे. त्यासाठी लोप पावत चाललेल्या अनेक शब्दांचा त्यांनी परिचय करून दिला आहे. 'किडूक-मिडूक' हा शब्द पूर्वी खेड्यात सहज बोलला जात असे. संसारात काटकसर करून पैसा, सोन्याचे दागिने, घागर, तांब्या अशा मौलिक वस्तू जपून ठेवल्या जात असत; परंतु कुटुंबावर संकट आल्यास ह्या सर्व वस्तू विकाव्या लागत. याचवेळी "धरातले 'किडुक मिडुक' विकले." असे तो सांगतो. व्यवहारात हा शब्द कोणत्या अर्थाने वापरला जात असे; हे सांगत असताना तो शब्द कसा तयार झाला; याविषयी इतर भाषाभ्यासकांची मतेही लेखक नोंदवितात. 'कुटिक' म्हणजे सोन्याचा दागिना यापासून हा शब्द तयार झाला आहे. तर अन्य काही अभ्यासकांना हा शब्द कानडीतल्या 'कुडूक' पासून निर्माण झाला असावा, असे वाटते. 'कुडुक' शब्दाचा अर्थ दागिना असाच आहे. अर्थाला वजन प्राप्त होण्यासाठी, त्याचा परिणाम वाढविण्यासाठी समाहार द्वंद्व साधणारा 'मिडूक' शब्द त्याला लावण्यांत आलेला आहे. त्यामुळे अर्थाला खरोखरच परिणामकारकता लाभली आहे. अशा एका शब्दांची ओळख करून देताना, त्या शब्दाच्या विविध अर्थच्छटा, त्या शब्दाची लय, काव्यात्मकता व शब्द वापरण्यामागची धारणा लेखकाने सांगितली आहे. बोली ही मर्यादित क्षेत्रात बोलली जाते. ह्या बोलीभाषेतील प्रामुख्याने खेड्यात बोलल्या जाणाऱ्या एका शब्दावरून ग्रामीण संस्कृती वाचकांच्या डोळ्यांसमोर उभी राहाते. दैन्य, दारिद्र्य, भूक, उपासमार असलेले असे खेडे वाचकाच्या डोळ्यांसमोर उभे राहाते. भाषा कोणतीही असो; ती एकटी येत नाही. ती आपली प्रादेशिक संस्कृती बरोबर घेऊन येते. 'जावळ' हा असाच खूप कौतुकाने उच्चारला जाणारा शब्द. जावळ काढण्याचा विधी लांबत गेला, तर त्या जावळाची आईला वेणी घालावी लागे अशा जावळाचे आईला खूप कौतुक असे. जावळाविषयीची आपली भावना ती ओवीतून व्यक्त करते. 'मोटारीपरास जाती सायकली तोऱ्यानी । माझ्या बाळाचं जावाळ उडे बाई वाऱ्यानी ।' मध्वमुनी या संत कवीनेही आईचे वात्सल्य व्यक्त केले आहे– ते असे. "लेकुरवाळी ओवाळिते । जावळासी कुरवाळिते ॥" जावळ काढण्याच्या विधीची लेखकाने माहिती सांगितली आहे. मामाच्या मांडीवर मुलाला बसवले जाई. केसांची पहिली बट मामाच कापतो; आणि मग उरलेले केस न्हावी कापतो. मामाला नव्या कापडाचा आहेर केला जातो. न्हाव्यालाही कपडे, मोबदला दिला जातो. 'जावळ' या एका शब्दावरून लोकसंस्कृतीचे दर्शन घडते. लोकजीवनामध्ये जावळ काढण्याच्या विधीला किती अनन्यसाधारण महत्त्व होते, तेही समजते. 'बांधाटी', 'बारगीट', 'ताईत', 'तळखडा', 'तलफ', 'तलंग', 'तराळ', 'पाठराखण', 'पिकदाणी' अशा अनेक महत्त्वाच्या शब्दांची लेखकाने ओळख करून दिली आहे. हे करीत असताना लेखकाने संत तुकाराम, संत ज्ञानेश्वर, संत एकनाथ अशा संतांच्या काव्याचे संदर्भ दिले आहेत.

थोडक्यात मराठी भाषेच्या अभ्यासकांना उपयुक्त ठरावा असा हा ग्रंथ आहे.

***

**ग्रामीण बोलीचा शब्दकोश**
**संपादक :** डॉ. द. ता. भोसले
'ग्रंथाली', मुंबई.

**प्रा. वामन जाधव.**
(महाडिक कॉलेज, मोडनिंब)

परीक्षण

# 'लपविलेल्या वहीत' डोकावताना ....

– यशवंतराव गडाख - पाटील

*[शब्द हे कवितेचे प्रथम साक्षीदार असतात. प्रतिनिधी असतात. त्यांना तपासून त्यातील शब्दांमधील निरूक्त शोधणे हे समीक्षकाचे कार्य असते. त्यासाठी शब्दांचे आधार घेऊन 'झरा मूळचा खरा' शोधावा लागतो. कवितेसाठी निमित्त कोणतेही असो, तिची चिंतनशीलता हाच तिचा धर्म आहे. अशीच एक 'लपविलेली' कविता शोधण्याचा प्रयत्न!*

*– संपादक]*

कवी संजीव तनपुरे यांनी 'लपविलेली वही' आज आपल्या हातात सोपवली आहे. अर्थात यातील कविता आपल्यासमोर ठेवताना त्यांनी सुरुवातीलाच म्हटलं आहे,

*"कुठलीच कविता*
*व्यक्त करू शकत नाही तुम्हाला*
*अगदी तसेच्या तसे*
*दोन ओळींच्यामध्ये*
*कित्येकदा लपलेली असते*
*हुबेहूब दुसरी कविता"*

कविता वाचणं अन् कविता अनुभवणं यामध्ये जे अंतर असतं ते या दोन ओळींमध्ये सामावलेलं असतं.

प्रातिनिधिक स्वरूपात स्वत:च्या आणि स्वत:भोवतालच्या विश्वाचा शोध घेणाऱ्या त्यांच्या कविता आहेत. भावनाशील मनाने आलेल्या अनुभवांना ते सामोरे जातात. त्याला चिंतनाची साथ लाभल्यामुळे त्यात प्रगल्भताही आलेली आहे. त्यांच्या बहुतांशी कविता या प्रतीकात्मक आहेत. प्रथमदर्शनी जाणवणाऱ्या अर्थापेक्षा कवीला वेगळंच काही सांगायचं आहे, हे त्या कवितेचं चिंतन केल्यावर जाणवतं. त्यांच्या कवितेचं हे जसं वेगळेपण आहे, तसंच हे उत्कृष्ट काव्यरचनेचं लक्षणदेखील आहे.

त्यांच्या कवितेत विषयांची विविधता दिसून येते.



प्रेम आणि निसर्ग हे तर कवीचे आवडते विषय. याशिवाय कौटुंबिक, सामाजिक, आध्यात्मिक आणि चिंतनात्मक कविताही आहेत. कवितेच्या आणि कवितेची निर्मितिप्रक्रिया सांगणाऱ्याही काही कविता आहेत.

काव्यसंग्रहाच्या प्रारंभीच ते आपला 'इरादा' सांगून टाकतात. आपलं अस्तित्व हे फांदीवर थांबलेल्या चिमणीसारखं असलं, तरी अंतर्यामी गरुडासारखं झेपावण्याची ऊर्मी आहे, असं ते स्पष्ट करतात. त्यांचा तो प्रयत्न कितपत यशस्वी झालाय, हे वाचकांनी त्यांच्या कविता वाचूनच ठरवायचं आहे. त्यांची निराशा निश्चितच होणार नाही.

या संग्रहातील 'बाप' आणि 'घर' या कौटुंबिक





कविता आहेत. प्रत्येकाच्याच जीवनाची सुरुवात या दोन घटकांपासून होते. आई त्यांचा समन्वय साधणारी असते. मुलाने आपल्यासारखंच किंबहुना आपल्यापेक्षाही मोठं व्हावं, असं बापाला वाटतं. त्यादृष्टीनेच तो मुलाचं संवर्धन करतो. त्यांच्यावर तसे संस्कार करतो, तर घर त्या सर्वांना त्यांच्या सुख-दुःखांसह सामावून घेतं. प्रसंगी सावरतं, बळ देतं.

'दिवा' ही सामाजिक कविता परिवर्तनाचा संदेश घेऊन येते. वैचारिक समन्वयातून क्रांती घडेल असा विश्वास ती व्यक्त करते. क्रांतीची खरी सुरुवात ही स्त्रीपासून होते पण ती कशी असावी अन् कशी असू नये हे 'क्रांती' या कवितेतून येते.

स्त्रीमध्ये होत गेलेला बदल 'नवाजन्म'मधून येतो, तर स्त्रीची भूमिका आणि अपेक्षा 'मोठा वाटा' मधून येतात. स्त्रीच्या परिवर्तनाला पुरुषांचीही साथ हवी; अशी अपेक्षा घेऊन ही कविता येते.

सद्यस्थितीच्या समाजजीवनाचं 'आमची माणसं'मधून घडणारं दर्शन अंतर्मुख करविणारं आहे. विचार करायलाही फुरसत मिळू नये, अशी गतिमानता जीवनाला आलेली आहे. सर्वसामान्यांना साहजिकच प्रश्न पडतो.

*"प्रवास लांबचा म्हणावा*
*तर आत्ताच सुरू झाल्यासारखा*
*आणि जवळचा म्हणावा*
*तर खूप दूर झालेला*
*ही कसली विसंगती!"*

स्वतःला 'संकुचित' करून घेऊन आत्ममग्न वृत्तीने जगणारी माणसंही समाजात आहेत. त्यांनी आपल्या अंतर्मनात डोकावून स्वतःचा शोध घ्यावा. अशी अपेक्षा या कवितेतून व्यक्त करण्यात आलेली आहे.

रूढ अर्थाने प्रेमकविता म्हणता येतील अशा काही काव्यरचना या संग्रहात आहेत. मात्र त्यामधील 'तू'-'मी'चे संबंध हे बहुतांशी व्यक्तिगत स्वरूपात न येता प्रातिनिधिक म्हणूनच अधिक आहेत. भावनिक पातळीवरील त्यांच्या प्रेमात परिपक्वता आहे. समर्पणात उदात्तपणा आहे. एकमेकांना सावरून घेण्याची भावना आहे.

'येळकोट' ही सावधगिरीचा 'इशारा' देते, तर 'हुंदका' सुख-दुःख मनात साठवून ठेवू नये; असं सांगते. संभाव्य परिणाम लक्षात घेऊन माणूस 'मेंदी'पासूनच दुःख टाळण्याचा प्रयत्न करतो पण कुठल्यातरी मार्गाने ते येतंच. अशा वेळेस 'फुंकर' ही कवितेचं निमित्त बनते. परस्परांना समजून घेतलं तर सुख-दुःखाचं 'संतुलन' होतं; अन् 'ऊन' देखील नात्याला घट्ट करतं. मनाचा 'टिपकागद' होऊन दुःख अलगद शोषलं जातं. दुःखाला वेगळं परिमाण दिलं की 'रंग/नाती' 'घट्ट' होतात. स्वतःच्या भावना मनात ठेवून ती त्याला सावरते. त्यांच्या सुख-दुःखांशी जुळवून घेते. पण 'तू' मधील तिचं जाणंही त्याला काहीतरी देऊन जातं. 'सावली'सारखी कविता समर्पित जीवनाचं दर्शन घडविते. निसर्गाचं एक 'चिरंतन' सत्य सांगताना कवी म्हणतात,

*"ज्याचं आभाळ डोक्यावर*
*आणि पाय मातीशी*
*त्यालाच मिळेल आता*
*ऊन, पाऊस अन् वारा"*

निसर्गविश्व फुलविणाऱ्या पावसाबद्दल कवीमनाला असलेली ओढ या संग्रहातील वेगवेगळ्या कवितांमधून अनुभवाला येते. आपल्या आगमनातून पाऊस निरनिराळे संदेशही देत असतो. पावसाशी एकरूप झालं की वेगळं अस्तित्व कसं उरत नाही; हे 'पाऊस वेडी'मधून समजतं. हृदयातले दुःखाचे 'आवेग' स्वतःजवळ ठेवून सभोवताली प्रसन्नता निर्माण करायची असते.



अनुक्रमणिका

त्याचप्रमाणे आजूबाजूच्या परिस्थितीचे संदर्भ उलगडता येण्याइतकी 'उमज'ही हवी. पावसानंतरचा ओलावा मनभर रुळायला हवा. पावसाची वेगवेगळी रूपे कशी असतात, हे 'तऱ्हा पाऊस'मधून बघायला मिळतं. तर पावसाच्या पडण्याच्या स्वरूपावरून प्रादेशिकता समजते. पाऊस आणि वीज ढगाढगांतूनच निर्माण होते. पण दोन्हीच्या आविष्कारामध्ये जमीन-अस्मानाची तफ़ावत असते. 'वीज होऊ दे' ही कविता प्रतीकात्मकता घेऊन येते. त्याचप्रमाणे न पडणारा पाऊसही 'दुष्काळ' घेऊन येतो. सागराचं बदलतं रूप आणि समृद्धी 'यथार्थ उत्तर'मधून प्रत्ययास येते.

चिंतनशीलता हा या संग्रहातील कवितेचा स्थायीभाव आहे. आयुष्य अनुभवताना तनमनाची होणारी 'अवस्था' आणि त्यामागील कारणमीमांसा अशा कवितांमधून प्रकट होते. 'अस्वस्थ' जीवनाचा शोध घेऊ पाहाते, तर 'वाढदिवस' जीवनाचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करते. संवेदनशील मनाची तगमग 'शाप/उ:शाप'मधून व्यक्त होते. 'दिङ्मूढ'मधून मनाची कुंठितावस्था अनुभवाला येते. चिरंजीवित्वाचा शाप घेऊन आलेली वेदना अन् तनामनाचा संवाद साधून देऊनही मुक्त असणारी 'जाणीव' भावनेला हात घालते, तर 'श्रद्धा' ही आता डळमळीत होऊ पाहाते आहे, असा अनुभव एखादी कविता सांगून जाते.

यातल्या काही कविता कवितेच्या अंतरंगावर भाष्य करतात.

प्रतिभेला जन्म देणारी 'सरस्वती' कवीला प्रेरणा देते; अन् कवितेशी त्याची 'थेट भेट' घडवून आणते. कवितेतून स्वत:चा शोध कसा घ्यावा, हे 'आरसा'मधून कळतं, तर कधी कधी कवितेचं उद्दिष्ट तिच्यातून स्पष्ट होतं. कधी कविता समन्वयाचं माध्यम बनून 'खांदा' ही देते, तर कधी ती समरसतेची नितळ अनुभूती देते.

या संग्रहातील स्फुट कविताही अर्थपूर्ण आहेत. त्या विविध विषय घेऊन येतात. रसिकांवर समृद्ध आशयाची पखरण करतात. तसेच आशयपूर्ण रेषाविष्कारांनी त्यातील अर्थ गहिरा होत जातो.

एकंदरीत यातील सर्वच कविता काव्यरसिकांना कमी-अधिक प्रमाणात भावतील अशी खात्री वाटते. त्यातून काहीतरी नवीन मिळविल्याचा आनंद त्यांना मिळेल. कवीच्या कल्पकतेचा, विचारसमृद्धीचा आणि भाषिक आविष्कारांचा परिचय होईल. खूप काही सांगूनही काहीतरी सांगायचं राहिलं असं कवीला संग्रहाच्या अखेरच्या क्षणीदेखील वाटतं; आणि हे वाटत राहाणं, ही अतृप्ती, हे असमाधान, ही तगमग, मनाची घालमेल हाच तर कवीचा अंत:स्रोत आहे. बाह्यजगाला त्याची जाणीव नसते आणि म्हणून म्हणतात "शव हे कवीचे जाळू नका हो. जन्मभरी तो जळतचि होता." हे जळत राहाणं हेच कवीचा मूळ स्रोत आहे. त्याशिवाय कविता होऊ शकत नाही आणि हीच भावना जपली, तर ते साहित्यक्षेत्रात अधिक योगदान करू शकतील. त्यांच्या साहित्यप्रांतातील वाटचालीला मी मन:पूर्वक शुभेच्छा देतो.

***

**यशवंतराव गडाख पाटील.**
'विरंगुळा', यशवंत वसाहत,
औरंगाबाद मार्ग, अहमदनगर.

**'लपविलेली वही' (कवितासंग्रह)**
**कवी-संजय तनपुरे (९८५०७१५१४७)**
आनंदघन प्रकाशन,
३१ प्रोग्रेसिव्ह व्हिला, आय, प्लॉ. नं. ७७
सेक्टर १९, सी.बी.डी., नवी मुंबई ४००६१४
मार्च २०१४

(व्यक्तिविशेष)

# केवलम् ज्ञानमूर्ती!

– डॉ. शिरीष चिंधडे

*[पुणे विद्यापीठाच्या इंग्रजी विभागाचे भूतपूर्व प्रमुख डॉ. एस. नागराजन यांना श्रद्धांजली वाहणारा हा लेख ज्ञानमार्गी निष्ठावान शिक्षकाचे व्यक्तिमत्त्व साकार करणारा आहे. सर्वच क्षेत्रातील अभ्यासक व संशोधकांना मार्गदर्शक आहे. – संपादक]*

डॉ. एस. नागराजन गेल्याचे कळले आणि मन भूतकाळात गेले. सन '६८ आणि '६९ अशी दोन वर्षे मी त्यांचा विद्यार्थी होतो. मला "ऑनर्स"चे मार्क होते, त्यामुळे वाटत होते की एम.ए.ला सहज प्रवेश मिळेल पण पुणे विद्यापीठात प्रवेशाच्या वेळीच त्यांनी झटका दिला, "यापेक्षा जास्त मार्क का नाही मिळाले?" मी हादरलोच. आणि म्हणालो, "सर, परीक्षेच्या वेळी मी काविळीने बराच आजारी होतो..." ते म्हणाले, "ते ठीक आहे, पण इथे अगदी काविळीची सबब सांगून देखील अभ्यास टाळता येणार नाही!"

इंग्रजी विभागातली एम.ए.ची दोन वर्षे अशी झटके आणि फटके खाण्यात गेली. शेक्सपिअर, मिल्टन, मिल, कार्लाइल, ब्राउनिंग, डिकिन्स, असे अनेक साहित्यसिंह आधीच आम्हाला खायला टपलेले होते. त्यात हे नागराजन रिंगमास्तर! लेखी ट्यूटोरियल दिले की चार दिवसांनी ते प्रत्येक शब्दाभोवती लाल वर्तुळे घेऊनच येणार. चुकीचे शब्दप्रयोग, चुकीची उपपदे, चुकीची शब्दयोगी अव्यये, आणि शून्य विश्लेषण, असे अनेक प्रमाद आम्ही केलेले असत पण हे सर्व अत्यंत काळजीपूर्वक पाहिले जाई; आणि मग समोर बसवून, कसे लिहावे ते सविस्तरपणे सांगितले जाई. त्याबाबत अजिबात टाळाटाळ, कंटाळा, चालढकल नसे. एखाद्याच्या लेखनात एखाद्या बाजारू गाईडमधला मजकूर चोरलेला असला तर तो त्यांना चटकन सापडायचा. त्याकाळी 'मलिक' नावाच्या कुणा लेखकाची गाइडस् विद्यार्थी वापरत असत. त्यात मोठमोठी अवतरणे दिलेली असत. त्याआधी "So-and-so rightly observes..." अशी सुरुवात असे. त्यावर डॉ. नागनाथ म्हणायचे, "हा मलिक म्हणजे एक निर्लज्ज निरीक्षक दिसतोय!" (This Mallik is a shameless observer.) तास संपल्यानंतर सर्वांनी जयकर ग्रंथालयात गेलेच पाहिजे, असा दंडक होता. आम्ही तिथे आहोत की नाही, हे पाहायला सर यायचे!

इतके सुगम इंग्रजी, इतके भारदस्त बोलणे, इतके सुंदर विवेचन वर्गात चालायचे की जणू एखादी गाण्याची मैफिल रंगलेली असावी! प्रसंगी सरांचा आवाज फार हळू होई आणि मागच्या बाकांवर तो ऐकू येत नसे. कोणी तशी तक्रार करायची हिंमत केलीच तर म्हणायचे, "माझा आवाज ताणता येणार नाही, पण तुम्ही तुमचे कान ताणू शकता!" फोनवर बोलताना मात्र एवढे मोठ्याने बोलत की पलीकडच्याला रिसीव्हरशिवाय सहज ऐकू जावे! मध्येच बोलण्यात खास दक्षिणी ढंग येई. विशेषत: 'इनफ'च्या ऐवजी 'यनफ' किंवा 'यलो'ऐवजी 'यल्लो' वगैरे व्हायचे. पण एकूण बोलणे स्वच्छ, सुंदर. हजरजबाबीपणा तर एवढा की मौज वाटायची. माझी धाकटी बहीणदेखील त्यांची विद्यार्थिनी. तिच्या लग्नाचे आमंत्रण द्यायला आम्ही सरांकडे गेलो. "कोण हा लकी मुलगा? काय करतो? कुठे असतो?" वगैरे सरांनी विचारले. बहीण म्हणाली, "सर, तो मालेगावला डॉक्टर आहे, पण पुण्यात राहिल्यानंतर मालेगावला कायमचे राहायला जाणे कसेतरीच..." तिचे बोलणे संपायच्या

आत सर त्यांच्या विशिष्ट खट्याळपणे हसले आणि म्हणाले, "यू लिटल फूल, सीता वेन्ट टू दंडकारण्य विथ राम!" सगळे बोलणेच थांबले! मग सर म्हणाले, "Find your happiness where you are." पण हे तत्त्व त्यांनी स्वत: पाळले नाही, कारण ते पुण्यावर नाराज होऊन निघून गेले...

सर कठोर बोलत; शिस्त लावत. गुणवत्तेत आणि कार्यनिष्ठेत तडजोड नसे. कुणी एम.ए. झाल्याबरोबर त्यांच्याकडे 'पीएच.डी'साठी गेला की म्हणायचे, "दहा वर्षांनी तयारी करून या!" कोणी जर म्हणाला, "सर मला पीएच.डी करायची आहे. तुम्ही एखादा विषय सुचवा!" तर सर म्हणायचे, "तरुण माणसा, लग्न तुला करायचं आहे. तुझी बायको तूच निवडायला हवी ना?" असे अनेक किस्से त्यांच्या विद्यार्थ्यांच्या संग्रही असतील. " 'पीएच.डी'साठी कुणाला संधी न देऊन त्यांनी अनेक मुलांवर अन्याय केला." असा एक प्रवाद होता. चार विद्यार्थी 'पीएच.डी' न झाल्यामुळे नुकसान झालेच असेल तर ते काही व्यक्तींचे; परंतु अध्ययनाच्या चांगल्या सवयी लावल्याने पुढे जे अनेक विद्यार्थी पीएच.डी न होताही प्राध्यापक झाले; त्या अनेक विद्यार्थ्यांचा फायदा झाला, हे दृष्टीआड करता येत नाही. डॉ. नाग हे प्रसिद्ध हार्वर्ड विद्यापीठाचे विद्यार्थी. गुणवत्तेचा मानदंड समजल्या जाणाऱ्या हार्वर्ड विद्यापीठाची काय परंपरा आहे? हार्वर्डचे एक कुलगुरू डेरेक बॉक यांनी एक आठवण सांगितली आहे. हार्वर्ड बिझिनेस स्कूलमध्ये ऐन पंचविशीत प्राध्यापक म्हणून आलेला जॉर्ज डोरिओ लिहितो, "केवळ एका अभ्यासक्रमात माझ्या किमान पंचवीस विद्यार्थ्यांना मी प्रतिदिनी दहा ते पंधरा तास काम करायला लावले आहे. हे विद्यार्थी शिक्षण पूर्ण करून जेव्हा कृतिशील जगात प्रवेशतील तेव्हा त्यांना समजेल की प्रामाणिकपणे दिवसभर काम करायचे याचा नेमका अर्थ काय असतो ते." हा तो संस्कार, हा तो वारसा! हे वाचल्यावर डॉ. नागराजन यांनी रक्तरंजित केलेली आमची ट्यूटोरिअल्स आणि त्यांच्या भेदक नजरेसमोर आम्ही कसे कोलमडत असू ते आठवते. एकूण हार्वर्डची काय शिस्त असेल, याचे काहीसे दर्शन हार्वर्डला न जाताच आम्हाला झाले, हेही नसे थोडके!

त्यांच्या शिकवण्याविषयी थोडे सांगायला हवे. ते शेक्सपिअरच्या साहित्याचे विशेष अभ्यासक होते. जगप्रसिद्ध 'सिग्नेट' प्रकाशनाने त्यांनी संपादित केलेल्या शेक्सपिअरचे 'मेझ्यर फॉर मेझ्यर' हे नाटक प्रकाशित केले आहे. नाटक शिकवायला घेण्यापूर्वी काही वेळा ते आम्हाला एखादा प्रवेश वाचून यायला सांगत. मग वर्गात अध्यापनापूर्वी त्यावर काही प्रश्न विचारत. एकदा मला त्यांनी 'offal' या शब्दाचा अर्थ विचारला. मला काही तो नेमका सांगता येईना. लगेच ते खुर्चीतून उठले, आपल्या खोलीत गेले, एक शब्दकोश आणला आणि तो माझ्यापुढे ठेवून म्हणाले, "लुक अप द वर्ड." आमच्यात शब्दकोश बघण्याची सवय त्यांनी अशी रुजवली; ती कायम राहिली. एकदा एका मुलीने एका शब्दाचा असाच काहीतरी चुकीचा अर्थ सांगितला. लगेच सर म्हणाले, "I am amazed at your charming ignorance!" इथे एक सांगायला हवे की, ही मुलगी खरोखरच 'चार्मिंग' होती. अशी सुंदर कोटी सहजच सुचलेली असे. ते नेहमी म्हणत, "इट इज बेटर टु नो वन वर्ड क्लीअरली than टू वर्ड्स व्हेगली." (दोन शब्दांचे अर्थ अस्पष्टपणे माहीत असण्यापेक्षा एकाच शब्दाचा अर्थ नेमकेपणाने माहीत असणे चांगले.) बऱ्याच वेळा आम्ही कुठून तरी काहीतरी उचलेगिरी करून उत्तरे लिहायचो. ते वाचून सर म्हणायचे, "समीक्षक काय म्हणतात ते मला सांगू नका. तुम्ही काय म्हणता ते महत्त्वाचे आहे." ते किती महत्त्वाचे आहे हे स्वत: शिकवायला लागल्यावर आणि विशेषत: संशोधन करायला लागल्यावर समजू लागले!

एका 'रिफ्रेशर्स् कोर्स'मध्ये ते जॉन डन या



अनुक्रमणिका

कवीची किंवा वर्डस्वर्थची एक कविता घेऊन तिचे सुंदर आणि सूक्ष्म विश्लेषण करत होते. जणू अनेक अंगांनी त्यांनी ती खणून काढली. इंग्रजीचे भारतभरचे प्राध्यापक समोर बसलेले होते. संगमनेरच्या प्रा. लिखिते यांनी हात वर करून प्रश्न उपस्थित केला; म्हणाले, ''सर, गुलाबाचे फूल तुमच्यासमोर टेबलावर आहे, पण तुम्ही त्याच्या सगळ्या पाकळ्या तोडून टाकल्या आहेत.'' प्रत्यक्ष नागराजनसमोर हे बोलण्याची हिंमत! सर्वत्र सन्नाटा पसरला. क्षणभर डॉ. नाग देखील थबकले; आणि आपल्या प्रसिद्ध खणखणीत आवाजात म्हणाले, ''मग मी काय कविता वाचल्यावर फक्त 'वाहव्वा', म्हणत राहू का? हा काय मुशायरा आहे का? वर्गात बोलताना हा 'वाहव्वा अप्रोच' काय कामाचा?'' तेव्हापासून 'वाहव्वा अप्रोच' ही शब्दसंहती काही काळ आमच्यामध्ये प्रचलित झाली! डॉ. नागराजन असे जिवंतपणीच एक दंतकथा - लीजंड - बनत गेले. ते आजही, आपल्यात नसूनही, 'तसेच' आमच्या नात आहेत. महाराष्ट्रातल्या त्यांच्या विद्यार्थ्यांनी गांना खूप प्रेम आणि आदर दिला, हे त्यांनी दखील अंतर्यामी नमूद केले होते.

त्यांची स्वत:ची कार्यक्षमता अथक होती आणि स्मरणशक्तीदेखील विलक्षण तीव्र होती. अध्ययन आणि अध्यापन यांवर त्यांची अविचल आणि अव्यभिचारी निष्ठा आणि प्रीती होती. ज्ञान हेच श्रेष्ठ मूल्य, हीच त्यांची श्रद्धा होती. त्यामुळेच त्यांचा विषय निघाला की आम्हां अनेकांना रॉबर्ट ब्राउनिंग च्या "A Grammarian's Funeral" कवितेतल्या रिनेसान-गौरवित विद्वान प्राध्यापकाचे स्मरण होते. खरोखरंच असा प्रभावी शिक्षक आणि अथांग विद्वान नेहमी होणे दुरापास्तच. ही दृष्टी, ही वृत्ती आपल्या विद्यार्थ्यांत बाणवण्याची त्यांची धडपड असे. परिणामत:, त्यांचे अनेक विद्यार्थी उत्कृष्ट शिक्षक आणि अभ्यासक म्हणून मान्यता पावले. आम्ही भाग्यवान की आम्हाला असे गुरुवर्य शिक्षक म्हणून लाभले आणि आमचे ''बोलो जाता बरळ'' त्यांच्यामुळेच नीट झाले!

इंग्रजी साहित्याच्या अभ्यासाला आणि अध्यापनक्षेत्राला ही सरांची देणगीच म्हणायची!

***

**शिरीष चिंधडे**
डॉ. शिरीष चिंधडे, ७ नीलांबरी, मेहेंदळे गॅरेजसमोर,
एरंडवणे, पुणे : ४११ ००४.
सेल : ९६६५०५०४७३





अनुक्रमणिका

# भाषांतर : 'करिअर'साठी संधी!

–ललिता मराठे

भाषांतर या प्रक्रियेस आज अधिकाधिक महत्त्व प्राप्त होताना दिसत आहे. जागतिकीकरणामुळे या क्षेत्रातील संधी वाढतच आहेत. एकेकाळी जाणिवेपलीकडच्या असलेल्या भाषा आत्मसात करून आज लोक भाषांतरकार म्हणून काम करत आहेत. मातृभाषा, राष्ट्रीय भाषा आणि परकीय भाषा या सर्वच भाषांमध्ये काम करण्यास आज **समान संधी** उपलब्ध आहेत. भाषांतराच्या क्षेत्रात अनुवादकांची नेहमीच वानवा असते, म्हणूनच चांगल्या भाषांतरकाराला अनन्यसाधारण महत्त्व आहे, होते व नेहमीच राहणार!

'कोश-निर्माण', 'व्हाईसओव्हर', 'डबिंग', 'ट्रान्सस्क्रिप्शन', 'इंटरप्रिटेशन', 'व्हॉइस प्रोसेस', प्रवाशांसाठी मार्गदर्शिका लेखन इत्यादी क्षेत्रांमध्ये देखील आज भारतीय व परकीय भाषा अवगत असणाऱ्या व्यक्तींना भरपूर संधी उपलब्ध आहेत.

इंटरनेटवर www.proz.com, www.-translatorsbase.com इत्यादी संकेतस्थळांवर भारतीय व परकीय भाषेच्या क्षेत्रात असणाऱ्या संधी व त्या क्षेत्रात काम करणाऱ्या व्यक्ती, यांची माहिती बघता येऊ शकेल.

'इंटरनेट'ने 'वसुधैव कुटुंबकम्' ही उक्ती अक्षरश: प्रत्यक्षात उतरवून दाखवली आहे. कोणतीही व्यक्ती जगातील कोणत्याही व्यक्तीशी क्षणार्धात संपर्क साधू शकते. येथे भाषेचा अडसर येत नाही. याचे कारण इंटरनेटवरील 'सर्च इंजिन'मध्ये वापरली जाणारी भाषांतराची सुविधा! इंग्रजीत उपलब्ध असलेली माहिती 'Translate this page' म्हटल्यावर काही क्षणांतच तुम्हाला हव्या त्या भाषेत तुमच्यासमोर येते! काय ते आश्चर्य! या सुविधेचे शिल्पकार, अर्थातच इंटरनेटच्या सेवेत असणारे अनुवादक, इंटरनेट भाषांतरासाठी जी सुविधा वापरतात, त्यास 'यांत्रिक भाषांतर सुविधा' (Machine trasnlation) असे म्हणतात. या प्रकारच्या भाषांतरामध्ये कधीकधी चुकादेखील होऊ शकतात; परंतु साधारण अर्थ वाचकांसमोर येऊन पोहोचतो. याच माहितीचे जर अचूक भाषांतर हवे असेल; तर ह्यासाठी व्यावसायिक भाषांतरकार आज उपलब्ध आहेत. त्यांचे काम आहे, एका भाषेतून दिलेल्या माहितीचे दुसऱ्या भाषेत बिनचूक भाषांतर करून देणे. सर्व मोठ्या शहरांमध्ये ही सेवा उपलब्ध असते. आपल्याला भाषांतर करून हवी असलेली माहिती आपण एखाद्या भाषांतर 'एजन्सी'कडून अथवा व्यावसायिक भाषांतरकाराकडून करून घेऊ शकतो. थोडीफारच वाक्ये भाषांतर करून हवी असतील व दोन्ही भाषांची ओळख असेल, तर 'इंटरनेट'वरील सुविधा पुरेशी ठरते. त्या भाषांतरातील चुका समजण्याइतपत जर दोन्ही भाषा अवगत असतील, तर मग ती माहिती पुन्हा भाषांतर करून घेण्याची आवश्यकता भासत नाही. भाषांतरक्षेत्रात काम करण्यास भरपूर वाव आहे. भाषांतर एजन्सीकडे अनुवादक, मुद्रितशोधक, संपादक, 'पेजिंग आर्टिस्ट' असे सर्व लोक काम करत असतात. भाषांतर करून, ते तपासून, त्या विषयातील सर्व शब्द बरोबर वापरले गेले आहेत, याची खात्री करून मगच ते ग्राहकांकडे पाठवले जातात. ग्राहक ज्या भाषेतून अनुवाद करून घेतो, त्याला म्हणतात, 'स्रोत भाषा' व ज्या भाषेमध्ये अनुवाद करायवयाचा असेल, त्याला म्हणतात 'साध्य भाषा.' भाषांतर करण्यासाठी अर्थातच दोन्ही भाषांवर प्रभुत्व असणे अत्यावश्यक आहे. भाषेच्या व्याकरणाबरोबरच देश-प्रदेशाची संस्कृती, तेथील राजकीय-सामाजिक वातावरण याची देखील माहिती असलेली उपयोगी ठरते. भाषांतर करताना, सांस्कृतिक फरकामुळे निर्माण होणारे समज यामुळे टाळता येऊ शकतात. भाषा शिकत असतानाच सांस्कृतिक-सामाजिक बाबींचा विचार होत गेला; तर भाषेतील तांत्रिक ज्ञानाबरोबरच या गोष्टींही भाषांतर करताना विचारात घ्यायची सवय





अनुक्रमणिका

लागते. यासाठी स्रोत व साध्य भाषांमधील अवांतर वाचन अवश्य करावे, यामुळे सांस्कृतिक माहिती आत्मसात करता येते.

शालेय जीवनापासून शब्दांचा छंद असेल तर त्याचा परकीय भाषा शिकताना उपयोग होतो. नवनवीन शब्दांचे अर्थ जाणून घेणे, शब्दांची व्युत्पत्ती शोधणे, नवीन शब्द लक्षात ठेवणे हा छंद फायद्याचा ठरतो. एका वस्तूसाठी अनेक शब्द, क्रियेवरून अथवा वैशिष्ट्यांवरून तयार केलेले शब्द, याचा नाद नवनवीन भाषाशैली अवगत करताना उपयोगी पडतो. अशाने शब्दांविषयी वाटणारी जिज्ञासा आणि आपुलकी वाढतच जाते. शब्दांचे सामर्थ्य, त्याची व्याप्ती आणि त्यांचे नित्यत्व अमर्याद आहे; याची जाणीव असली, की हातून चांगले काम होते. भाषांतरकार होण्यासाठी आवश्यक बाब म्हणजे वाचनाची सवय. वाचनाची आवड मर्यादित ठेवून चालत नाही, कारण भाषांतरव्यवसायात भाषांतर करण्यासाठी कोणता विषय आपल्यासमोर येईल हे माहिती नसते. विषयांचे वैविध्य, नावीन्य मनात ठेवून पुस्तके शोधून वाचत गेल्यास बुद्धीला व मनाला आपोआपच प्रगल्भता येते; आणि त्याचे पडसाद अर्थातच भाषांतरावर उमटतात. कथा, कादंबऱ्या, प्रवासवर्णने, वृत्तपत्रे, पुराणकथा, ऐतिहासिक, आध्यात्मिक या विषयांवरील पुस्तकांचे वाचन उपयोगी पडते. वाङ्मयीन साहित्याबरोबरच उपकरणांबरोबर येणाऱ्या माहितीपुस्तिका, बँकेतील फॉर्म, वृत्तपत्रांतील निवेदने, तांत्रिक माहिती असणारी पुस्तके, अभियांत्रिकी व वैद्यकीय माहिती असणारी पुस्तके अशा वाचनाची जोड मिळाली; तर एक भाषांतरकार म्हणून अधिक ज्ञान व शब्दवैभव तयार होते. हा भाषांतरकारांसाठी एक अभ्यासच आहे. विविध विषयांतील माहिती, 'फॉर्म' आज इंटरनेटवर उपलब्ध असल्यामुळे भाषांतरकाराला घरबसल्या सर्व माहिती पटकन मिळते. ती वाचून तांत्रिक परिभाषेचे ज्ञान तो वाढवू शकतो.

भाषांतरकार दोन प्रकारचे असतात. १) लिखित शब्दांचे भाषांतर करणारे आणि २) दोन अगर अधिक व्यक्ती बोलत असताना – त्या शब्दांचे भाषांतर करणारे, अर्थात दुभाषे! दुभाषांचे काम करण्यासाठी त्याला घटनास्थळी जावे लागते. भाषांतरकार मात्र एकाच ठिकाणी राहून हे काम करत असतो.

लिखित भाषांतरकारांमध्ये देखील दोन प्रकार असतात. १. वाङ्मयीन लेखन, समीक्षा, प्रबंध, उपशीर्षके, जाहिराती यांचे भाषांतर करणारे भाषांतरकार व २. तांत्रिक ज्ञानाचे भाषांतर करणारे भाषांतरकार. जसे की वैद्यकीय, कायदेविषयक, शासकीय कार्यभाग, वृत्तपत्रातील निवेदने, विज्ञान शाखा, मानसशास्त्र, अभियांत्रिकी इत्यादी. दोन्ही प्रकारची भाषांतरे करणे म्हणजे परिश्रमाचे आणि चिकाटीचे काम आहे. या कामासाठी वाचन, निरीक्षण, श्रवण यांची जोड असावी लागते.

वाङ्मयीन साहित्याचे भाषांतर करणाऱ्यांना दोन्ही भाषांचे व्याकरण, त्या देश-प्रदेशातील संस्कृती, शब्दांचे बाज, या गोष्टींचे भान भाषांतर करताना ठेवावे लागते. शब्दश: भाषांतर करत गेल्यास वाचकाला भाषांतरित साहित्य दुर्बोध वाटू शकते. शब्दांपलीकडे जाऊन, संहितेतील 'सत्त्व' पकडून ते साध्य भाषेमध्ये मांडण्याचे शिवधनुष्य भाषांतरकाराला पेलायचे असते. मराठीतील छंदोरचना, यमक, प्रादेशिक संदर्भ इंग्रजी भाषांतरामध्ये जसेच्या तसे येतीलच असे नाही. त्यासाठी मूळ संहितेत थोडेफार बदल करून पण मूळ कथानकाला धक्का न लावता, भाषांतरकार ती कलाकृती नव्याने सादर करण्याचा प्रयत्न करत असतो. अशिष्ट आणि बोली भाषेतील शब्दांचे भाषांतर जसेच्या तसे दुसऱ्या भाषेत करणे सूज्ञपणाचे ठरणार नाही. ज्या भाषेतील भाषांतर करावयाचे, त्या भाषेचा, आशयाचा व विषयाचा सखोल विचार करूनच शब्दांची निवड निश्चित करावी लागेल. वाङ्मयीन संहितेचे भाषांतर हे अतिरिक्त विदेशी अथवा परके वाटू नये; याची काळजी घ्यावी लागते. जर्मन, फ्रेंच, रशियन, इंग्रजी साहित्यातील कथा भारतीय भाषांमध्ये आणताना भाषांतरकाराला प्रश्न पडतो तो हा की, मूळ संहितेतील पात्रांची नावे, साचा, घटना, संदर्भ तीच ठेवावीत की, त्याचे 'भारतीय' संदर्भात रूपांतर करून मग कथाबीज त्यात गुंफावे? हा निर्णय व्यक्तिश: प्रत्येक भाषांतरकार त्या-त्या संहितेप्रमाणे घेत असतो.



अनुक्रमणिका

मूळ कथेतील राजकीय, सामाजिक संदर्भ साध्य भाषेमध्ये सुयोग्य पद्धतीने पोहोचविणे, जेणेकरून वाचकाला ती कथा आपलीशी वाटावी, हेच खरे भाषांतरकाराचे कौशल्य! अनुवाद वाचताना हेच मूळ पुस्तक आहे असे वाटले पाहिजे, तरच ते भाषांतर वाचकांपर्यंत पोहोचले असे म्हणायला हरकत नाही. वाङ्मयीन साहित्यातील भाषांतरकारांनी जगातील उत्तमोत्तम साहित्य सर्वसामान्य वाचकांपर्यंत नेऊन पोहोचविले आहे. उदाहणार्थ सत्यजित राय लिखित 'फॅन्टस्टिक फेलूदा' रहस्यमाला, ही मूळ बंगालीतून श्री.. अशोक जैन यांनी मराठीत आणली. मूळ कन्नड लेखिका सुधा मूर्ती यांच्या 'डॉलर बहू' या कादंबरीचा उमा वि. कुलकर्णी यांनी केलेला अनुवाद. मूळ लेखक सर आर्थर कॉनन डायल यांच्या 'शेरलॉक होम्स' या सुप्रसिद्ध रहस्यकथांचा श्री. गजानन क्षीरसागर यांनी मराठीत केलेला अनुवाद. मूळ जर्मन लेखक स्टिफन ज्झ्वाइग यांच्या 'शाखानोव्हेल'चा बी. डब्लू ह्युब्श यांनी इंग्रजीमध्ये 'The Royal Game' नावाने केलेला अनुवाद. मूळ जर्मन लेखक क्लाऊन मान यांच्या 'मेफिस्टो' या जर्मन कादंबरीचा रॉबिन स्मिथ यांनी इंग्रजीत केलेला अनुवाद. The immortals of Meluha या मूळ इंग्रजी अमिश त्रिपाठी लिखित पुस्तकाचा डॉ. मीना शेटे-संभू यांनी मराठीत केलेला अनुवाद. जे. के. रोलिंग लिखित मूळ इंग्रजी हॅरी पॉटर या पुस्तकांचा मंजुषा आमडेकर यांनी केलेला अनुवाद वाचताना कोठेही सांस्कृतिक, प्रादेशिक व भाषिक अडसर जाणवत नाही. मूळ विषय थेट वाचकांच्या मनाला जाऊन भिडतो.

तांत्रिक विषयातील भाषांतराचे काम करताना मात्र फक्त त्याच विषयाचे भान ठेवून चालते. दोन्ही भाषांवरील प्रभुत्व आणि कोणताही तांत्रिक विषय समजून घेऊन त्यानुसार योग्य शब्द निवड करण्याची हातोटी या भाषांतरकाराकडे असते. भाषांतरकार तंत्रज्ञान, कायदा, वैद्यकशास्त्र, अभियांत्रिकी, विज्ञान, मानसशास्त्र इ. विषयांशी परिचित असेलच असे नाही. बहुश्रुतपणा, विषय समजून घेण्याची हातोटी, इंटरनेटवर सहजगत्या उपलब्ध असलेली माहिती, विविध विषयांवरील ऑनलाईन शब्दकोश यांची मदत घेऊन भाषांतरकार तो विषय समर्थपणे हाताळू शकतो. तांत्रिक विषयाचे भाषांतर करताना आपल्या मनाचा एकही शब्द भाषांतरकार त्यात घालू शकत नाही. मूळ वाक्य जसेच्या तसे दुसऱ्या भाषेत पोहोचविणे हे या भाषांतरकाराचे काम होय. पुष्कळवेळा तांत्रिक भाषांतरकार वाङ्मयीन साहित्याचे भाषांतर करू शकत नाहीत, किंवा तसे करणे त्यांना जड जाते, याचे कारण एकाच प्रकारच्या भाषांतराची झालेली सवय.

तांत्रिक भाषांतरकाराला काम करण्यासाठी विविध क्षेत्रे खुणावत आहेत. कॉर्पोरेट, ऑटोमोबाईल, इन्शुरन्स कंपनी, परदेशी बँका, सॉफ्टवेअर कंपनी, भाषांतर एजन्सी येथे. विशेषत: परकीय भाषांमध्ये काम करणाऱ्या भाषांतरकारांना भरपूर संधी उपलब्ध आहेत. नोकरीचा मार्ग स्वीकारायचा नसल्यास स्वतंत्र भाषांतरकार म्हणून स्वतंत्र व्यवसाय सुरू करता येतो. हातात घेतलेले काम वेळेवर पूर्ण करून देणे; हेच या क्षेत्रात यशस्वी होण्यासाठी अत्यावश्यक आहे. परकीय भाषांमध्ये भाषांतरकाराला अनेक संधी उपलब्ध आहेत. त्याचप्रमाणे त्या भारतीय भाषांमध्येदेखील उपलब्ध आहेत. इतर व्यवसायांप्रमाणेच सचोटी, प्रामाणिकपणा व वेळेत काम पूर्ण करण्यावर या क्षेत्रात भर द्यावा लागतो. इंटरनेटवरील 'वेबसाईट'वर (संकेतस्थळावर) नाव नोंदवल्यानंतर काही दिवसांतच काम मिळावयास सुरुवात होते. स्पर्धेत टिकून राहाण्यासाठी कामाचा वेग, कोणताही विषय हाताळण्याची तयारी या गोष्टींचा निश्चित उपयोग होतो. स्वतंत्रपणे काम करणाऱ्या भाषांतरकाराला सतर्क राहून सतत नवनवीन ग्राहकांपर्यंत पोहोचून आपल्या व्यवसायाचा पसारा वाढवावा लागतो.

'परकीय भाषांमधील भाषांतरकार' हे एक आकर्षक करिअर नव्याने समोर आले आहे. त्याचा लाभ सर्व भाषांतरकार घेत आहेत.

***

**ललिता मराठे**
पुणे, जर्मन-मराठी अनुवादिका
transcriptservices@gmail.com
9921354171



अनुक्रमणिका

# निवडक नवे

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेसाठी आलेल्या ग्रंथांपैकी निवडक ग्रंथांचा परिचय करून देणारे सदर

– नंदा सुर्वे



**मेळघाटावरील मोहर**

मेळघाट म्हणजे सातपुडा पर्वतातील घनदाट अरण्यप्रदेश. सातपुड्याच्या पर्वतरांगांमध्ये पसरलेलं अत्यंत घनदाट ज़ंगल हे मेळघाटचं वैशिष्ट्य. देशातील मोजक्या निबिड अरण्यांमध्ये त्याची गणना होते. अशा वातावरणात तिथल्या आदिवासी जमातीचं प्रबोधन करणे; आणि त्यांना वैद्यकीय मदत करणे, या तळमळीच्या भावनेतून डॉ. रवीद्र कोल्हे आणि स्मिता कोल्हे यांनी एक दुस्तर प्रकल्प हाती घेतला. त्यांचा निर्णय पक्का होता. ते त्या भागातल्या बैरागड इथे दाखल झाले. कमालीच्या प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी प्रबोधनाचं काम सुरू केलं. भयप्रद अडथळ्यांना ते सामोरे जात राहिले – विंचू, साप, पाली यांच्या घरातच ते जणू राहात होते. अनेक घटना, प्रसंग यामध्ये आलेले आहेत, की ज्यातून ते न डगमगता, कच न खाता पुढे सरसावले आहेत. सारं रखरखीत वास्तव त्यांनी पचवलं आहे. आदिवासींच्या निबरट मानसिकतेतून त्यांना बाहेर काढण्याचा भीषण प्रवास मृणालिनी चितळे यांनी ताकदीनं उभा केला आहे. या लेखिकेची दखल घेणं आवश्यक आहे, कारण अत्यंत चिवटपणे, मनाची उभारी धरत त्यांनी डॉ. कोल्हे पति-पत्नीशी सतत संपर्क ठेवला. त्यातून या प्रबोधनाच्या अंतहीन प्रवासाचं चित्र वाचकांसमोर उभं केलं आहे.

**पुस्तक : मेळघाटातील मोहर -- डॉ. रवींद्र आणि डॉ. स्मिता कोल्हे (चरित्रात्मक प्रबोधन)**
*लेखिका :* मृणालिनी चितळे
*प्रकाशन :* राजहंस प्रकाशन, एप्रिल २०१४
*किंमत :* ३००/- रु., *पृष्ठे :* ३००

**वॉर्ड नं. ९ - ससून हॉस्पिटल**



वैद्यकीय व्यवसायातल्या आपल्या समग्र अनुभवांचं हे स्मरणरंजन आहे, असं लेखकानं मनोगतात म्हटलं आहे. आपल्याला सर्जन होण्याचा लहानपणापासून लागलेला ध्यास, ते प्रत्यक्षात उतरणं आणि सर्जन म्हणून लोकांना सामोरं जाणं हा त्यांचा यशस्वी प्रवास यामध्ये शब्दबद्ध केला आहे. त्याला त्यांनी 'आनंदप्रवास' असं म्हटलेलं आहे. एखाद्या सर्जनची कारकीर्द किती विविधरंगी असू शकते, हे लेखकानं स्वत:कडे त्रयस्थपणे बघत सांगितलं आहे. निराश, हताश होण्याचे क्षण अधूनमधून आले तरी मनातं खोलवर दाटलीय ती समाधानाची भावना.... कुणाच्या तरी वेदना शमल्याचं समाधान.

अत्यंत निरलसपणे, प्रांजळपणे त्यांनी या व्यवसायाकडे बघितलं. पैसा आणि लौकिक ही ध्येयं त्यांनी कधीच डोळ्यांसमोर ठेवली नव्हती. निकोप मनानं त्यांनी आयुष्यभर 'सेवा' केली. डॉक्टरांची प्रतिमा सुधारण्याविषयी, स्त्रीभ्रूणहत्येविषयी आणि बलात्काराविषयी त्यांनी सडेतोड विचार मांडले आहेत. खरंतर हे पुस्तक वाचल्यानंतरच सविस्तर माहिती

मिळू शकेल. आवर्जून वाचावं.

**पुस्तक : वॉर्ड नं. ९ - ससून हॉस्पिटल** (आत्मचरित्रात्मक)
*लेखक* : डॉ. विलास अंविके, जाने. २०१४
*प्रकाशन* : दिलीपराज प्रकाशन, पुणे
*किंमत* : १३० रु., *पृष्ठे* : १२०

**यशवंतराव चव्हाण विचारधन - एक सुवर्ण ठेवा**

महाराष्ट्राचं एक आदरणीय राजकीय व्यक्तिमत्त्व म्हणजे मा. यशवंतराव चव्हाण. एक सुसंस्कृत, मूल्यवादी, निष्कलंक व्यक्तिमत्त्व म्हणून त्यांचा सन्मानानं उल्लेख केला जातो. चतुरस्त्र व्यासंगी वाचक, साक्षेपी लेखक, प्रभावी वक्ता, अभिरुची संपन्न, कलारसिक असे अनेक पैलू त्यांच्या व्यक्तिमत्त्वात आहेत.

यशवंतराव चव्हाणांचे मौलिक विचार या पुस्तकात संकलित स्वरूपात सापडतात. ते वाचत असताना या समृद्ध व्यक्तिमत्त्वाचा ठसा गडद गडद होत जातो.



शब्दसामर्थ्य व सौंदर्य, महाराष्ट्राचे चिंतन, राष्ट्रनिष्ठा, साहित्याचा व्यासंग, लोकशाहीची विचारधारा, पत्रसंवाद या शीर्षकांखाली त्यातले विचारधन वाचकांसमोर एकाच पुस्तकात आपल्याला वाचायला मिळतात. हे व्यक्तिमत्त्व एवढ्या उंचीवर गेलेलं असूनही खूप नम्र होतं, याचा प्रत्यय या विचारांच्या ठेव्यातून मिळतो.

**पुस्तक : यशवंतराव चव्हाण विचारधन एक सुवर्णठेवा.** (वैचारिक)
जाने. २०१४
*संकलक* : अमर शेंडे
*प्रकाशक* : स्मिता शेंडे
फलटण
*किंमत* : रु. १००/-, *पृष्ठे* : ७८

**सृजनाचा मळा**

ललित लेखनात ज्यांचं नाव अग्रस्थानावर असे साक्षेपी लेखक फादर फ्रान्सिस दिब्रिटो यांचा 'सृजनाचा मळा' हा नवा ललितलेखसंग्रह वाचकांसमोर आलेला आहे. महाराष्ट्र टाइम्स, सकाळ, तरुण भारत, साप्ताहिक सकाळ, पुढारी, लोकसत्ता, साधना, सुवार्ता अशा विविध वृत्तपत्रांमधून, नियतकालिकांमधून वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या प्रसन्न, सदासतेज लेखांचं हे संकलन आहे.

'सृजनाचा मळा' या पुस्तकाच्या ललितरम्य शीर्षकामध्येच लेखनातल्या लालित्याचं प्रतिबिंब पडलेलं दिसतं. 'लोभसवाणा पक्षी', 'कोजागिरीचा नृत्यरंग', 'खेळ मांडियेला', 'एकाकी आभाळ', 'चाफा बोलेना', 'कोकिळ-कूजन' अशा काही लेखांच्या शीर्षकांमधूनच लेखकामधलं हळुवारपण, संवेदनशीलता लक्षात येते. मग प्रत्यक्ष लेखांच्या वाचनात आपण शिरतो, तेव्हा "उत्तररात्री कळ्यांना गोड स्वप्ने पडू लागतात. काय दडलेले असते बरे त्या स्वप्नांच्या काळजात? ...." अशा मंत्रमुग्ध शब्दांची पेरणी झाल्याचं दिसतं.



" 'कोकिळेचं कूजन' हे प्रेमगीत असतं की विलापगीत? समजत नाही. नाहीतरी करुणा आणि वेदना यांचे निकटचे नाते आहेच. कोकिळेच्या गीतातील आर्तता काळजाला भिडते." अशा वाक्यांमधून लेखकाच्या कविमनाची साक्ष जागोजागी प्रत्ययास येते.

सुंदर शब्दांच्या योजनेबरोबरच अर्थसौंदर्य, आशयसौंदर्य, त्यातून येणारी ज्ञानाची रुजवण, अनुभूतींचा आस्वाद लेखनात उतरणं हा ललितलेखनाचा गाभा आहे. फ्रान्सिस दिब्रिटो यांच्याजवळ सर्जनशीलतेचं आभाळ आहे. त्यांमुळे या पुस्तकाचं पान न् पान वाचनीय झालं आहे. 'आनंद हेच आनंदाचं पारितोषिक असतं.' असं लेखकानं एका लेखात म्हटलं आहे.



अनुक्रमणिका

त्या अर्थानं पाहिलं तर हे पुस्तक लेखकानं आनंदाचं पारितोषिक म्हणून वाचकांना बहाल केलं आहे. मन:पूत वाचत जावं.

**पुस्तक : सृजनाचा मळा** - (ललित) मे २०१४
*लेखक* : फादर फ्रान्सिस दि ब्रिटो
*प्रकाशक* : राजहंस प्रकाशन प्रा. लि., पुणे ३०.
*किंमत* : रु. १५०/-, *पृष्ठे* : १३७

**मुळारंभ**

या कादंबरीत तरुणाईचं भावविश्व उभं केलं आहे. विशेषत: महाविद्यालयांमध्ये प्रवेश घेतलेल्या तरुणांची मानसिक उलाढाल लेखकानं यामध्ये शब्दबद्ध केली आहे. नव्हाळीत उद्‌भवणारं थोडं भय, थोडी आशंका, थोडी उलघाल, चलबिचल आणि बरंचसं आकर्षण हे सारं टिपताटिपता, त्यांचं मानसिक अवस्थांतर हा त्या वयातल्या तरुणाईचा आत्मा आहे. ह्या अवस्थांतराचा आलेख लेखकानं कादंबरीच्या माध्यमातून रेखाटला आहे. परस्परांच्या आकर्षणातून निर्माण झालेलं प्रेमविश्व, त्यातला हळुवारपणा, त्यातील कोवळेपण उभं करताना त्यात होत जाणारे बदल आणि या बदलांना सामोरे जाणारे पालक, शिक्षक हे सारे या कादंबरीत गुंफले आहेत. एका महाविद्यालयातलं वर्तमानविश्व यात उभं केलं आहे.




**पुस्तक : मुळारंभ (कादंबरी)**
*लेखक* : आशुतोष जावडेकर, जून २०१४
*प्रकाशक* : राजहंस प्रकाशन, पुणे
*किंमत* : रु. २५०/-, *पृष्ठे* : २३२

**माती मोकळी होताना**

प्रत्येक कवी आपलं वेगळेपण दाखवण्याचा, ते जपण्याचा प्रयत्न करत असतो. 'माती मोकळी होताना' या शीर्षकातूनच स्वत: मोकळं होत-होत आपलं वेगळेपण प्रस्थापित करण्याचा स्रोत या साऱ्या कवितांमधून दिसतो. 'मनाला पुसावी मनाची खुशाली, आतली बोलणी, होऊ द्या मोकळी'. स्वत:ला मोकळं करत जाण्याची, मोकळं ठेवत जाण्याची प्रक्रिया काव्यसंग्रहाच्या आरंभातच सुरू झालेली दिसते.



या कवयित्रीनं मोकळीक घेण्याचे पाच टप्पे, या कवितासंग्रहात, काव्यबद्ध केलेले आहेत.

माती : आयुष्यातून मोकळी होताना
माती : नात्यातून मोकळी होताना
माती : माणसातून मोकळी होताना
माती : अनुभवातून मोकळी होताना
माती : निसर्गातून मोकळी होताना

या वेगवेगळ्या प्रवाहांचं मातीतून निसटून जाणं, हा एक प्रकारचा मानसिक जाचच आहे. तो असह्य आहे. त्या भावओव्या जाचातून व्याकुळ होताना कवयित्री म्हणते –

*लखोपती पोरगा आमचा*
*लखपती सून आहे*
*दोघंही राहातात अमेरिकेत*
*आमच्यापाशी कोण आहे.*

आशयघनता आणि सहजता हा साऱ्या कवितांचा प्राण आहे. फार सुंदर शब्दकळेत तो गुंफला गेलाय. ह्या ओळी पाहा—

*घट्ट कराच्या वज्रमुठीने*
*सारू काल तमाचा*
*पहा उगवला पूर्वेला*
*तो राजा चराचराचा*

अशाच खूप साऱ्या काव्यपंक्ती पानापानावरं विखुरलेल्या. मनाच्या तळापर्यंत पोहोचणाऱ्या!

**पुस्तक : माती मोकळी होताना** (कविता)
*कवियित्री* : स्वाती शिंदे-पवार, जाने. २०१४
*प्रकाशक* : प्रतिमा प्रकाशन, पुणे
*पृष्ठे* : १६८, *किंमत* : रु. १५०/-

## महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे

(अंक क्र. ३१० ते अंक क्र. ३४८— सप्टेंबर २००४ ते सप्टेंबर २०१४ चे सिंहावलोकन) सूचीसाठी

*[महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शताब्दीनिमित्ताने, डॉ. मीरा धांडगे यांनी, प्रारंभ ते डिसेंबर २००४ ह्या कालखंडाची सूची २७ मे २००६ रोजी तयार केली. त्यानंतरच्या, दहा वर्षाच्या साहित्य पत्रिकेच्या सदोतीस अंकांची, सूची करणे आवश्यक आहे. सप्टेंबर २००४ ते सप्टेंबर २०१४ ह्या कालखंडातील अंक माझ्या संपादनाखाली तयार झाले आहेत. सूची तयार करण्यासाठी; आणि ह्या कालखंडातील नव्या साहित्यप्रवाहांचा शोध घेण्यासाठी, त्यांचा धावता आढावा घेतला आहे. – संपादक (डॉ. सु. प्र. कुलकर्णी) ]*

### अंक क्र. ३१० (जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००४)

संपादकीय– लोककवी वामन कर्डक, सौंदर्यमीमांसाकार डॉ. रा. भा. पाटणकर, 'रूपवादी' समीक्षेचे प्रा. दावतर, 'वसंत'चे संपादक वाळशंकर देशपांडे, नवमतवादी रॉइस्ट' डॉ. इंदुमती पारीख यांना श्रद्धांजली. – डॉ. पु.ग. सहस्रबुद्धे यांच्यावर – स.ह. देशपांडे. मध्ययुगीन मराठी वाङ्मय : मूल्यशोधाच्या दिशा : डॉ. द. दि. पुंडे, नाथांचे रुक्मिणी स्वयंवर : नवोपलब्ध संहिता : डॉ. शिवाजी विष्णू पाटील, स्त्री विकासाच्या पाऊलखुणा : डॉ. मृणालिनी शहा, राम घनश्याम-काही विचार : डॉ. ब्रह्मानंद देशपांडे.

### अंक क्र.३११ (ऑक्टोबर २००४ ते डिसेंबर २००४)

मुखपृष्ठ– ७८ वे अ.भा.मराठी साहित्यसंमेलनाध्यक्ष– प्रा. केशव मेश्राम आणि संपादकीय
आत्मचरित्राची संकल्पना : रवींद्र किंवहुने
'अर्धविराम' (आमदार गडाख पा. यांचे आत्मचरित्र) परीक्षण : रंगनाथ पठारे
दलित रंगभूमीने नाट्यक्षेत्रात निर्माण केलेले प्रश्न : ले. दत्ता भगत
अहिराणी म्हणी : डॉ. म.सु. पगारे
मराठीतील प्रवासवर्णनाची वाटचाल : डॉ. सु.प्र. कुलकर्णी

### अंक क्र. ३१२ (जानेवारी २००५ ते मार्च २००५)

मुखपृष्ठ– (सामान्य), संपादकीयात विविध घटनांचा आढावा.
तंजावरच्या कोरीव लेखातील समाजदर्शन : डॉ. माणिक धनपलवार
वसंत आबाजी डहाके यांच्या 'प्रदेश'च्या निमित्ताने : प्रा. एम.पी. पाटील
डॉ. मो. गो. धडपळे : "विठ्ठल मागे मुक्ती"
सामाजिक परिस्थिती आणि साहित्यसंस्कृती : मिलिंद बोकील
समकालीन ग्रामीण जीवन आणि साहित्यिकांची जबाबदारी : डॉ. चं.वि. जोशी
अहिराणी बोली : डॉ. बापूराव देसाई (आणि परीक्षणे)
'पालखी' : आशा भिडे

## अंक क्र. ३१३ (एप्रिल-मे-जून २००५)

मुखपृष्ठ– शताब्दी शुभारंभ सोहळा, २७, २८ मे २००५ श्रीगणेश अध्यात्मदर्शन : डॉ. सुशीला पाटील परीक्षण : 'जेजुरी' : डॉ. अ. पां. दाणी, लोकप्रिय काणेकर : रवींद्र पिंगे, 'टाहो' : आसाराम लोमटे, जगाला प्रेम अर्पावे : डॉ. किसन पाटील, डॉ. मृणालिनी गडकरीची मुलाखत : प्रा. सुजाता शेणई, रे. टिळक यांच्या जीवनावरील चरित्रात्मक कादंबरी : मृणालिनी शहा

## अंक ३१४ (जुलै-ऑगस्ट-सप्टेंबर २००५)

मुखपृष्ठ– विभावरी शिरूरकर (जन्मशताब्दी) (डॉ. स्वाती कर्वे यांचा लेख अंक क्र. ३१६ मध्ये)
परिषदेच्या शताब्दीनिमित्त परिसंवाद :
स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी साहित्याचे बदलते संदर्भ : (कादंबरी – डॉ. द. ता. भोसले, कविता : निशिकांत ठकार, नाटक : श्रीनिवास भणगे, आरोग्यविषयक साहित्य : डॉ. अरविंद संगमनेरकर)
वा. के. लेलेंचा भाषाविचार : डॉ. द. दि. पुंडे

## अंक क्र. ३१५ (ऑक्टोबर-नोव्हेंबर-डिसेंबर २००५)

मुखपृष्ठ– श्री. मारुती चितमपल्ली : ७९ व्या अ.भा. मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष.
चरित्रसमीक्षक डॉ. द. न. गोखले : जयंत वष्ट
वसंत आबाजी डहाके यांच्या कादंवरिका : प्रा. एम.पी. पाटील
आजच्या ग्रामीण जीवनाचे वास्तव : 'बारोमास' (विश्वास पाटील) यांच्या अकादमी-पारितोषिक प्राप्त कादंवरीची समीक्षा : प्रा. मेधा काळे
'विठ्ठल मागे मुक्ती' : डॉ. मो. गो. धडफळे, भांडारकर इन्स्टिट्यूटचे प्राच्यविद्या - अभ्यासक यांचा – पूजा, पुजारी, मूर्तिपूजा, देव – देवकल्पना आणि त्या अनुषंगाने देऊळ-राऊळ इ. वरील लेखावर औरंगाबाद येथील इतिहासाचे गाढे अभ्यासक डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांचा प्रतिक्रियात्मक लेख – संदर उद्बोधक चर्चा अंक क्र. ३१२, ३१५ आणि ३१६ मध्ये आहे.
समाजविकासाची मूलगामी चर्चा करणारा इंदुमती पारीख यांच्या 'समाजविकासासाठी व्यक्तिविकास या ग्रंथाचे परीक्षण डॉ. मृणालिनी शहा यांचे
सीमाप्रश्नासंबंधीचे ठरावं : डॉ. गं. ना. जोगळेकर (सीमाभागाचा समावेश महाराष्ट्रात करण्याबाबतचा ठराव बेळगाव महानगरपालिकेने केला म्हणून कर्नाटक शासनाने बेळगाव महानगरपालिका बरखास्त केली; आणि बेळगावचे तत्कालीन महापौर श्री. विजय मोरे व त्यांच्या सहकाऱ्यांना समाजकंटकांनी मारहाण केली म्हणून कर्नाटक शासनाचा निषेध करणारा ठराव.)

## अंक क्र. ३१६ (जानेवारी-फेब्रुवारी-मार्च २००६)

मुखपृष्ठ– ज्ञानपीठ पारितोषिकाचे मानकरी - कवि : विंदा करंदीकर
संपादकीय– विंदा करंदीकरांची जीवनसंहिता : डॉ. सु. प्र. कुलकर्णी

मराठी विज्ञान साहित्याची उपेक्षा का होत आहे : डॉ. बाळ फोंडके
विज्ञान, तंत्रज्ञान आणि समाज : प्रमोद काळे
समकालीन मराठी कथा-लेखिका – (१९९० ते २००५) : डॉ. अंजली सोमण
बोली-अभ्यास : एक दृष्टिकोन : डॉ. शिवाजी विष्णू पाटील
डॉ. विभावरी शिरूरकर यांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांच्या साहित्याचे लेखन व लेखनकाळाचा शोध – 'मनस्विनीचे स्मरण' : डॉ. स्वाती कर्वे.
'विठ्ठल मागे मुक्ती' वरील डॉ. ब्रह्मानंद देशपांडे यांच्या प्रतिक्रियेवरील अभिप्राय : डॉ. मो. गो. धडफळे
याशिवाय पुस्तक परीक्षणे

### अंक क्र. ३१७-३१८ जोडअंक (एप्रिल २००६ - सप्टेंबर २००६)

शताब्दीपूर्ती महोत्सव (१९०६ ते २००६) – संपादकीय : डॉ. सु.प्र. कुलकर्णी
शताब्दी (शुभारंभ ते सांगता) विविध प्रसंगांचे पुन:प्रत्ययी लेख – मधु नेने, काव्यस्पर्धा : एक काव्यानुभव साहित्य परिषद (कै. वा. गो. आपटेंच्या लेखाचे पुनर्मुद्रण), म.सा.प.चे संकेतस्थळ : प्रा. मिलिंद जोशी
एकविसाव्या शतकातील साहित्यसंस्था – स्थान व कार्य – परिसंवादातील विचार : शब्दांकन - संदीप कुलकर्णी, प्रा. रा. भ. जाधव
साहित्यपरिषदेचे 'वास्तुपुरुष' – नानासाहेब चापेकर : अरुण मैड,
मानवंदना – ज्ञानपीठ सन्मानिनाना : डॉ. माधवी वैद्य

### अंक क्र. ३१९ (ऑक्टो. २००६ ते डिसें. २००६)

विज्ञानकथा विशेषांक– निर्मितीप्रक्रिया
विज्ञान कथाकार– माधुरी शानभाग, निरंजन घाटे, लक्ष्मण लोंढे, सुबोध जावडेकर, अरुण मांडे ह्यांच्या विज्ञानकथा आणि त्यांच्या निर्मितिप्रक्रियेबाबत संबंधित कथाकारांचेच निवेदन. डॉ. रत्नाकर मंचरकर यांची प्रस्तावना आणि 'विज्ञान व कथा' हे संपादकीय. (डॉ. सु. प्र. कुलकर्णी)

### अंक क्र. ३२० (जानेवारी ते मार्च २००७)

मुखपृष्ठ– प्रयोगशील नाट्यधर्मी मो. ग. रांगणेकर – लेख : डॉ. वि. भा. देशपांडे.
संपादकीय– (कर्तबगार साहित्यिकांच्या अभिनंदनाचे), श्रीज्ञानदेव व 'बापरखुमादेवीवरू' : सुरेश जोशी (नगर), कादंबरीकार विश्वास पाटील : सौ. भाग्यश्री भा. जाधव, फाळणी – एक दु:खद विजय : प्रा. पद्माकर पुंडे, बाबूराव बागूल – प्रा. अजय देशपांडे.

### अंक ३२१-३२२ (जोडअंक) (एप्रिल २००७ ते सप्टेंबर २००७)

कै. डॉ. गं. ना. जोगळेकर – स्मृतीविशेष लेख आणि अन्य संशोधन – परीक्षणपर लेख.
संपादकीय– सरोजिनी वैद्य यांची समीक्षा : चांदणसमीक्षा : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
परदेशातील लेखिकांचे ललित ग्रंथ : डॉ. ज्योत्स्ना आफळे

आदिवासी कातकऱ्यांचे पारंपरिक नृत्य – झिंगी : डॉ. किरणकुमार कवठेकर

**अंक क्र. ३२३ (ऑक्टो. २००७ ते डिसें. २००७)**

मुखपृष्ठ– प्रा. म. द. हातकणंगलेकर ('उघडझाप' प्रा. हातकणंगलेकर ८१व्या अ.भा. मराठी साहित्यसंमेलनाध्यक्ष यांच्या आत्मचरित्राचा परिचय– लेख : प्रा. जानाजी राऊ पाटील.)
सव्वाशे वर्षांचे संगीत सौभद्र : डॉ. वि. भा. देशपांडे,
ध्यासपर्व – श्री. रावसाहेब शिंदे यांच्या आत्मचरित्राचे परीक्षण : प्रा. ग. प्र. प्रधान.
नाट्यसंगीत – नाटकातील आणि मैफिलीतील : ले. सौ. धनश्री खरवंडीकर
श्री.के. क्षीरसागर यांच्या समीक्षक व्यक्तिमत्त्वाचा परिचय (पुस्तकपरीक्षणाने) : अ. दा. मराठे
बहुपेडी विंदा. (खंड– १ व २) परीक्षण : डॉ. सु. म. तडकोडकर
प्रार्थनेची घंटा (ललित) – मरीक्षण : डॉ. किसन पाटील
'जॅकपॉट' (आत्मचरित्र परीक्षण) : प्रा. पद्माकर पुंडे
'एका साळियाने' (आत्मचरित्र परीक्षण) : शांतिलाल भंडारी

**अंक क्र. ३२४ (जानेवारी २००८ ते मार्च २००८)**
**(श्रीसंत तुकाराम-महाराजांच्या चौथ्या जन्मशताब्दीनिमित्ताने विशेष स्मरण –विशेषांक)**

संपादकीय– देहबुद्धीचे मरण (डॉ. सु. प्र. कुलकर्णी), विविध लेख – श्री. रामकृष्ण गायकवाड, डॉ. संभाजी लांडगे, डॉ. रामचंद्र देखणे, डॉ. वि.य. कुलकर्णी, शांतिलाल भंडारी, डॉ. सतीश बडवे, प्रा. एम.पी. पाटील.

**अंक क्र. ३२५ (एप्रिल २००८ ते जून २००८)**
**(समर्थ रामदासस्वामी यांच्या चतुर्थ जन्मशताब्दीनिमित्त विशेष स्मरण. – विशेषांक)**

संपादकीय– युगधर्माचे कर्ते भाष्यकार डॉ. सु. प्र. कुलकर्णी, विविध लेख : विवेक घळसासी, सुनील चिंचोलकर, रवींद्र भट, डॉ. भास्कर गिरिधारी, मधु नेने, शीला निपुणगे, याशिवाय ग्रंथपरीक्षणे.
व्यक्तिपरिचय– विजय तेंडुलकर : डॉ. वि. भा. देशपांडे, महाराष्ट्राची 'अक्का' : डॉ. अनिल सहस्त्रबुद्धे

**अंक ३२६ (जुलै २००८ ते सप्टेंबर २००८)**

काव्य विशेषांक– काव्यविषयक लेख, आशय आणि आविष्कार संदर्भात,
संपादकीय– शुक्तिबिंदू योग : डॉ. सु.प्र. कुलकर्णी
ग्रेस – पाऊसशैली आणि मातृवनातील स्पंदने : डॉ. चं. वि. जोशी
ग्रेस : 'मी हलेन अश्रूपुरता : डॉ. चंद्रकांत पोतदार
मीरा तारळेकरांची भावकविता : डॉ. रवींद्र शोभणे
रामदास फुटाणेंची भाष्यकविता : अंजली कुलकर्णी
कवी संदीप खरेंची मुलाखत – (कविता सादरीकरणाबाबत) : स्वाती महाळंक

सती सावित्री (खंडकाव्य) प्रा. मंदा कदम – परीक्षण : डॉ. मंदा खांडगे

**अंक क्र. ३२७ (ऑक्टो. २००८ ते डिसेंबर २००८)**
**नवकथा - विशेषांक**

विद्यमान कथेची स्थितिगती शोधण्यासाठी गंगाधर गाडगीळस्मृतीप्रित्यर्थ
**कथा-स्पर्धा–** युवा गट आणि मुक्तगटात आयोजित केली. त्यातील प्रथम क्रमांकाच्या कथा, लेखक परिचयासह प्रकाशित केल्या. तसेच गंगाधर गाडगीळांची (खरं सांगायचं म्हणजे–)
जी.ए. कुलकर्णींची (कैरी), आनंद यादवांची ('इंजेन') ह्या कथा आणि त्यांची शैलीलक्ष्य निरीक्षणे – डॉ. सुरेश जोशी यांनी केली. **महानगरी कथा –** प्रा. संजय नगरकर तसेच 'कथास्पर्धेच्या निमित्ताने' शंकर सारडांची निरीक्षणे आणि 'कथारूप' हे संपादकीय (डॉ. सु. प्र. कुलकर्णी).

**अंक क्र. ३२८ (जानेवारी २००९ ते मार्च २००९)**
**बोली विशेषांक (महाराष्ट्रातील विविध बोलीअभ्यासकांचे लेख)**

मुखपृष्ठ– डॉ. आनंद यादवांची ८२व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाध्यक्ष म्हणून निवड
संपादकीय– साहित्यातील 'खळाळ'...! : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
डांगाणी बोली (डॉ. अ.ना. सहस्त्रबुद्धे), माणदेशी बोली (डॉ. सयाजी मोकाशी), भिलोरी बोली (डॉ. पुष्पा गावित), मराठवाडी बोली (डॉ. केशव देशमुख), गोंधळी समाजाची 'पारूषी' (रेणुकादास उबाळे), अहिराणी (डॉ. रमेश सूर्यवंशी), गोल्ला समाजाची गोलेवार बोली (डॉ. धोंडिराम वाडकर), वऱ्हाडी बोलीची कविता (डॉ. प्रतिमा इंगोले), फारशी-मराठी अनुबंध : (पद्मश्री डॉ. यू.म. पठाण) – डॉ. अशोक कामत, याशिवाय अन्य परीक्षण लेख – ह्या अंकानंतरच्या जवळजवळ प्रत्येक अंकात बोलीविषयी लेख आहेत. – कोल्हाटी बोली (प्रा. विजयकुमार फरांदे अंक क्र. ३३०), 'झाडी' बोली (डॉ. हरिश्चंद्र बोरकर-अंक क्र. ३२९), तावडी बोली (अशोक कौतिक कोळी अंक क्र. ३३१) धाराशिव भाषाविष्कार (प्रा. अर्जुन व्हटकर - अंक क्र. ३४०).

**अंक क्र. ३२९ (एप्रिल २००९ ते जून २००९)**

मुखपृष्ठ– मराठी वाङ्मयाचा इतिहास (खंड ७ वा भाग १ ला १९५० ते २०००) प्रकाशित झाला.
संपादकीय– 'साहित्याचे विभ्रम...' : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
झाडी बोली : (डॉ. हरिश्चंद्र बोरकर), सिंधी भाषा- (प्रा. लछमन हर्दवाणी)
कविता आणि गूढता : डॉ. द.भि. कुलकर्णी, 'तेथे चल राणी' : प्रा. एम. पी. पाटील
एक शैली वैज्ञानिक .अभ्यास : डॉ. शकुंतला क्षीरसागर, विठोबा पाईची वीट : शीला निपुणगे
'भारतीय भाषातील स्त्री-साहित्याचा मागोवा' : डॉ. उज्ज्वला गोखले, 'सम्राज्ञी' : डॉ. राजेंद्र साने
'आजकाल' आणि 'समेपासून... समेपर्यंत' : डॉ. मुकुंद संगोराम

**अंक क्र. ३३० (जुलै ते सप्टेंबर २००९)**



**अंक ३३१ (ऑक्टोबर २००९ ते डिसेंबर २००९)**



**अंक क्र. ३३२ (जानेवारी २०१० ते मार्च २०१०)**

अस्वस्थ चित्रांची संवेद्य लिपी – 'चित्रलिपी' : रेणुकादास उबाळे
जागतिकीकरण आणि विश्वधर्म : पद्मश्री यू.म. पठाण
गीतरामायणातील नादलयीचा गोफ : डॉ. शकुंतला क्षीरसागर
कबीर आणि तुकारामाचे सम्यक् दर्शन : डॉ. लक्ष्मीनारायण बोल्ली

**अंक क्र. ३३३ (एप्रिल २०१० ते जून २०१०)**

मुखपृष्ठ– सूत्रधारप्रधान नाट्य (नाट्य विशेषांक)
संपादकीय– मराठी फार्सेस (विशेषत: नारायणराव पेशवे यांच्या वधाचा)
नाट्य विशेषांक – फार्सेस, नाट्यसंगीत, नाट्याविष्कार
गायक-नट, लोकबंधांचा नाट्याविष्कार इ. घटकांवरील अभ्यासपूर्ण लेख याशिवाय विविध परीक्षणे.
मुखपृष्ठ – सूत्रधार प्रधान मराठी नाटकाचे स्वरूप दर्शविणारे लेख.
नाट्यवेद : डॉ. सौ. श्रद्धा सोमण
लोकबंधाचे नाट्याविष्कार : डॉ. अनिल सहस्रबुद्धे, बोलीच्या अभ्यासाविषयी : पद्मश्री डॉ. यू.म. पठाण.
विनोदजीवी सन्मित्र – प्राचार्य बाळ गाडगीळ : म.द. हातकणंगलेकर
संगीतमय – नाट्याविष्कार – नांदी ते भरतवाक्य : ले. सौ. धनश्री खरवंडीकर
'गायक नटाची परंपरा आणि मा. दीनानाथ मंगेशकर : ले. वंदना रवींद्र गांगुर्डे.

**अंक क्र. ३३४ (जुलै २०१० ते सप्टेंबर २०१०)**

मुखपृष्ठ– कवी नारायण सुर्वे
संपादकीय– नारायण सुर्वेच्या कवितेच्या निमित्ताने 'विरूपिकेचे सौंदर्यशास्त्र' : डॉ. सु.प्र. कुलकर्णी
मुस्लिम मराठी आत्मकथनाचे स्वरूप : शीतल चंद्रकांत जाधव
एकनाथांचा कृष्ण : शीला निपुणगे, अगस्त्य– डॉ. अनिल सहस्रबुद्धे यांच्या कादंबरीचे परीक्षण : अंजली पटवर्धन
बोली : समाज, साहित्य आणि संस्कृती : डॉ. मनोहर जाधव

**अंक क्र. ३३५ (ऑक्टो. २०१० ते डिसेंबर २०१०)**

मुखपृष्ठ– ८४ व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष – मा. उत्तम कांबळे व परिचय.
संपादकीय– शताब्दीच्या उंबरठ्यावर महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे
नार्वेजियन नाटककर : हेन्रिक इब्सेन (वसंत बागुल)
संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्याचे समूहदर्शन : 'हुतात्मा' ह्या कादंबरीचे परीक्षण – (सौ. अमृता खाकुर्डीकर)
ग्रेस यांच्या 'वाऱ्याने हलते पान' ललित लेखांचे परीक्षण (डॉ. चंद्रकांत पोतदार)
दलित साहित्याचा पुनर्विचार : डॉ. शशिकांत लोखंडे
तीन लक्षवेधी पुस्तके : डॉ. मुकुला कुलकर्णी

### अंक क्र. ३३६ (जोडअंक) (जानेवारी २०११ ते जून २०११)

मुखपृष्ठ– मराठी वाङ्मयाचा इतिहास (भाग १ ते ४)
(नव्या कार्यकारी मंडळाच्या २०११ ते २०१६ होणाऱ्या निवडणुकांमुळे नवे पदाधिकारी मंडळ व संपादक मंडळ अस्तित्वात येईपर्यंत काही काळ गेल्यामुळे जोडअंक काढावा लागला; आणि पोस्टखात्याच्या सूचनेमुळे एक नंबर द्यावा लागला. पान नं. ७ पाहा)
संपादकीय– मराठी समीक्षेचा पाया : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
मर्ढेकरांचा शैलीचमत्कार : डॉ. सुरेश भृगुवार
अनन्यता मर्ढेकरांची (ले. डॉ. द. भि. कुलकर्णी) – परीक्षण : कृष्णा चौधरी
संस्कृतीच्या पाऊलखुणा शोधणारा साहित्यिक : डॉ. द. ता. भोसले – प्रा. मिलिंद जोशी
संज्ञाप्रवाही लेखन : डॉ. द.ना. धनागरे, 'अनासक्त' : डॉ. सुहास पुजारी
प्राचीन भारतातील स्त्रीगौरव – एक समाजभाषा विज्ञान अभ्यास : शैलेश सदाशिव पुंडलिक
सृजनाच्या दु:खोत्सवाची देशी कविता : डॉ. किशोर सानप, एणे वरे ज्ञानदेवो : शीला निपुणगे
केशवसुतांच्या कवितेतील तारा : डॉ. सुभाष गढीकर
सोनफुलं – डॉ. मंदा खांडगेंच्या ललित लेखांचे परीक्षण, 'उत्कट संवेदनाशील ललितलेखन' : डॉ. ज्योत्स्ना आफळे, मुन्नी : डॉ. भगवान ठाकूर, वहिणाबाईच्या लेकी : सौ. अनघा ठोंबरे, 'अभंगपौर्णिमा' : अंजली पटवर्धन.

### अंक क्र. ३३७ (जुलै २०११ ते सप्टेंबर २०११)

मुखपृष्ठ– संगीतकार श्रीनिवास खळे यांच्या निधनाने भावगीतांविषयी – 'शब्दवती' – मुखपृष्ठ शब्दवतीची साथसंगत.
संपादकीय– 'शब्दवती' : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
विद्याधर पुंडलिकांच्या कथेतील जन्ममृत्यूचा वेध : डॉ. विद्यागौरी टिळक
चारूता सागर यांची कथा – समूहमनाची सांकेतिकता : डॉ. चंद्रकांत पोतदार
लघुकादंबरीचे साहित्यरूप (दीर्घकथा आणि लघुकादंबरी) यांचा तौलनिक अभ्यास : डॉ. स्वाती कर्वे,
संत संताजी जगनाडे : डॉ. फुला बागुल
माणदेशी शाहीर – बाबाखान दरवेशी : प्रा. जवाहर लक्ष्मण मोरे
वासुदेवशास्त्री खरे : सौ. सुमन प्रभुमिराशी, 'कापूसकाळ' : डॉ. सुभाष शेकडे
स्वातंत्र्य लढ्यातील सोलापूरचे दीपस्तंभ : डॉ. सौ. लता अक्कलूजकर.

### अंक ३३८ (ऑक्टोबर २०११ ते डिसेंबर २०११)

मुखपृष्ठ– आर. के. लक्ष्मण यांचा कॉमन मॅन'
संपादकीय– 'रेषाविष्कार' : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
'बोक्या सातबंडे' – दिलीप प्रभावळकरांच्या पुस्तकाला अकादमी पुरस्कार प्राप्त झाल्याच्या निमित्ताने – शंकर सारडा यांचा लेख.



अनुक्रमणिका







स्त्री-मुक्ती चळवळीचा प्रणेता – अग्रवंश : प्रा. वाग्वैद्य मो.गो. धडफळे
संत साहित्याचा सारकोश 'संत साहित्य सुभाषित कोश' (संपादक - रा.शं. नगरकर) परीक्षण : डॉ. कल्याण काळे, साक्षात्कारी लेखनप्रवास : अनघा ठोंबरे, प्रसारमाध्यमांची भाषा : सौ. सुप्रिया आवारे, 'मावळती' : रागिणी पुंडलिक

## अंक क्र. ३३९ (जानेवारी २०१२ ते मार्च २०१२)

मुखपृष्ठ– वसंत आबाजी डहाके – ८५ व्या अ.भा.मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष
संपादकीय– 'काळोखाचा राजपुत्र' – अस्तित्ववादी कवितेचा न-नायक – प्रा. डहाकेंच्या कवितेवर आधारित. (डॉ. सु. प्र. कुलकर्णी)
अंधारातून येणारे तुझे शब्दशर' – संतोष शेणई यांचा प्रा. डहाकेंच्या चिंतनशील लेखनाचा परामर्श घेणारा लेख.
साहित्य आणि समाजभान : अच्युत गोडबोले
डॉ. वाळिंबे यांची गडकऱ्यांच्या नाटकांची समीक्षा : डॉ. विनायक गंधे
कला ही जीवनाची पुनर्निर्मिती – ग्रेस : मनोहर सोनावणे आणि अन्य लेख
मराठी कवितेतील 'घर' (संपा. शीला निपुणगे) : टी. एन. परदेशी

## अंक क्र. ३४० (एप्रिल २०१२ ते जून २०१२)

मुखपृष्ठ– कवी 'ग्रेस' यांच्या कवितेशी निगडित – 'बुडता बुडता सांजप्रवाही...'
संपादकीय– अमरकण्टकाची वाटचाल – कवी ग्रेस यांच्या कवितेविषयी : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
'ग्रेसफुल ॲब्सर्डिटी' : प्रा. पद्माकर पुंडे
'कावळे उडाले स्वामी' : डॉ. चंद्रकांत भगवंत पोतदार
अलविदा! प्रिय ग्रेस... : डॉ. माधवी वैद्य
मी आणि माझे लेखन– कथेमागची कथा : भारत सासणे
मोनिका गजेंद्रगडकर यांचे कथाविश्व : डॉ. रवींद्र शोभणे
धाराशीव भाषाविष्कारातील साहित्य : प्रा. अर्जुन व्हटकर
प्रसारमाध्यमांची भाषा – का. रं. मित्र व्याख्यानमाला
आकाशवाणी (विजया मेहेंदळे)
दृकश्राव्य – (प्रसन्न जोशी)
वृत्तपत्रे – (नवनीत देशपांडे)
भारतीय भाषांचे भवितव्य – (डॉ. नीलिमा गुंडी)
अंतर्वेध – (यशवंतराव गडाख यांचे आत्मचरित्र) डॉ. द.ता. भोसले परीक्षण लेख.
'तळ ढवळताना' : डॉ. सतीश बडवे

## अंक क्र. ३४१ (जुलै २०१२ ते सप्टेंबर २०१२)



## अंक क्र. ३४२ (ऑक्टो २०१२ ते डिसेंबर २०१२)



## अंक क्र. ३४३ (जानेवारी २०१३ ते मार्च २०१३)

'किचन पोएम्स' धीरूबेन पटेल यांच्या कवितेचा अनुवाद – उषा मेहता – परीक्षण अंजली कुलकर्णी
नाना जोशी – चित्रकार व प्रकाशक : राजेन्द्र बनहट्टी
'निपुण' व्यक्तिमत्त्व : डॉ. आनंद यादव

**अंक क्र. ३४४-३४५ (एप्रिल २०१३ ते सप्टेंबर २०१३) (जोडअंक)**
**महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा शताब्दीपूर्ती विशेषांक (सप्टेंबर २०१३)**

संपादकीय– म.सा.पत्रिकेच्या १९१२ ते १९४३ मधील निवडक लेखांच्या आधारे – 'प्रबोधनाच्या पाऊलखुणा' – नवशिक्षितांपुढे दुहेरी आव्हान आणि आवाहन – स्वसमाजाला शहाणे करणे आणि स्वातंत्र्यप्राप्तीसाठी लढा देणे – दोहोंचा समतोल राखत कार्य करणे. म.सा.पत्रिकेने हा समतोल कसा साधला त्याचे दर्शन घडविणे हा हेतू स्पष्ट होईल असे विद्वत्तापूर्ण लेख/परीक्षणे.
या अंकातील समाविष्ट लेख :
ह्या अंकातील शुद्धलेखन : डॉ. लीला गोविलकर
म.सा. परिषदेचे पहिले कार्यकारी मंड़ळ (पा.नं.११) व विद्यमान (पा.नं.१४)
म.सा.पत्रिका व तिचे संपादक (कालानुक्रमे) – (पा. नं. १३)
चित्रकाव्य : कै. रा. रा. बळवंतराव कमळापूरकर, इंदूर
कलकत्याचे साहित्यसंमेलन : वा. गो. आपटे
गोविंद नारायण मांडगांवकर – (१८१५ ते १८६५) – बा. ना. देव
कै. ह. ना. आपटे यांचे त्रोटक चरित्र – काशीबाई कानिटकर
दिवेकर संपादित जयराम कविकृत 'पर्णालपर्वत ग्रहणाख्यान' – परीक्षण चिंतामण विनायक वैद्य
'सुशीलेचा देव' (ले. वामन मल्हार जोशी) – परीक्षण : शं. दा. पेंडसे
'इंदू काळे सरला भोळे' (ले. वामन मल्हार जोशी) परीक्षण : प्रो. दे. द. वाडेकर
इतिहास परिषद – अध्यक्षीय भाषण – श्री. गो. स. सरदेसाई
सिंधी-मराठी ह्या भाषांची तुलना – वि. वि. दीक्षित

**अंक क्र. ३४६ (ऑक्टोबर २०१३ ते डिसेंबर २०१३)**

मुखपृष्ठ– कवी फ.मु. शिंदे यांच्या काव्यमुद्रा ('आई'चे काव्य-अभिवाचन करताना) – त्यांची ८७व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावर निवड झाली, त्या निमित्ताने.
संपादकीय– काव्य आणि काव्यमुद्रा (कवितेच्या अभिवाचनावरील विचार) : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
डॉ. अलका कुलकर्णी यांच्या 'डाकीण' ह्या अंधश्रद्धेवरील कादंबरी 'चकवा' चे परीक्षण डॉ. फुला बागुल
चरित्र आणि आत्मचरित्रांशी संबंधित परीक्षणे –
डॉ. द.ता. भोसले यांचे 'बाळमुठीतील अनवाणी दिवस' (आत्मचरित्र) : डॉ. राजेंद्र दास
गिरीश कर्नाड यांचे आत्मचरित्र – 'खेळता खेळता आयुष्य : मेधा सिधये
ह. ल. निपुणगे यांचे आत्मचरित्र 'हलचल' : शंकर सारडा
चरित्र लेखनाचा नवा प्रकार – 'व्यक्तिविमर्श' यावरील डॉ. द.न. गोखले यांच्या चरित्रकलेसंबंधी विचार

: जयंत वष्ट.
'बोली'संबंधी लेख–
डॉक्टर पेशन्ट संवादाची मराठी बोली : डॉ. अरविंद संगमनेरकर
आदिवासी बोली भाषा : डॉ. पुष्पा यशवंत गावित
मर्ढेकरांच्या कवितेतील चिन्ह-लिपी : अरविंद हसमनीस

**अंक ३४७ (जानेवारी २०१४ ते मार्च २०१४)**

मुखपृष्ठ– नामदेव ढसाळ आणि त्यांची कविता – 'मी मारले सूर्याच्या रथाचे सात घोडे'
संपादकीय– काळोखाची काव्यचर्चा – नामदेव ढसाळ यांच्या कवितेतून प्रत्ययाला येणारी नवी काव्यचर्चा (श्रद्धांजलीच्या निमित्ताने)
'म.सा.प'चा पुराण पुरुष – म.श्री. दीक्षित : डॉ. मेधा सिधये
'लोकभाषा अभ्यासक पद्मश्री डॉ. गणेश देवी' यांच्या लोकभाषेच्या अभ्यासाचा परिचय करून देणारा लेख : डॉ. अनिल सहस्रबुद्धे.
सांगली जिल्ह्याची लावणी परंपरा : प्रा. आबासाहेब शामराव शिंदे.
सत्तर वर्षांपूर्वीची छंदचर्चा – वि. ज. सहस्रबुद्धे – समीक्षा : श्री. ना. बनहट्टी
जर्मनीतील तीन तपांच्या... आठवणींच्या जगात : निरुपमा प्रधान-सोनाळकर, श्रीमती कुमुद गाडगीळ
आस्वाद, अध्यापन, समीक्षा – सतीश बडवे : डॉ. आशुतोष पाटील
कवितेची आस्वादरूपे– डॉ. पंडितराव पवार : डॉ. पी. विठ्ठल
प्रदेश सृजनाचा– डॉ. सुहास पुजारी : प्रा. विश्वास वसेकर
दिवसाच्या वाटेवरून– डॉ. संगीता बर्वे : यशोधरा साठे

**अंक ३४८ (एप्रिल २०१४ ते सप्टेंबर २०१४)**

मुखपृष्ठ– कथा-कादंबरीकार कै. श्री. ज. जोशी (जन्मशताब्दी)
संपादकीय– ...आमुचा रामराम घ्यावा! : डॉ. सु. प्र. कुलकर्णी
'श्री. ज.' – एक आनंदाची बखर : ह. ल. निपुणगे
श्री. ज. जोशी यांची साहित्यसंपदा – संकलन : ह. ल. निपुणगे
'हा तेल नावाचा इतिहास...' गिरीश कुबेर – परीक्षण : डॉ. वृंदा कौजलगीकर
दि. पु. चित्रे यांची कविता – रणधीर शिंदे – समीक्षा : डॉ. नीलिमा गुंडी
दादोजी कोंडदेव : खंडन आणि मंडन – वा. ना. उत्पात
बहिरा जातवेदाचा – 'भैरवी' टीकाग्रंथ – प्राचार्य डॉ. मधुसूदन बोपर्डीकर
जात्यावरच्या ओव्या : एक स्वायत्त रूपबंध : सविता अशोक माळी
ग्रामीण बोलीचा शब्दकोश – द. ता. भोसले – डॉ. रामन जाधव
'लपविलेल्या वहीत' डोकावताना... : यशवंतराव गडाख-पाटील
केवलं ज्ञानमूर्ती : डॉ. शिरीष चिंधडे

भाषांतर : 'करिअर'साठी संधी : ललिता मराठे
निवडक नवे : नंदा सुर्वे
२०१४ मधील म.सा.प.कडे आलेल्या ग्रंथाचे स्वागत : महेंद्र मुंजाळ
कार्यवृत्त : प्रमुख कार्यवाह : प्रकाश पायगुडे

(टीप : 'निवडक नवे' सदरासाठी प्रा. मिलिंद जोशी, स्वाती महाळंक, उद्धव कानडे, नंदा सुर्वे आणि संपादक ह्यांनी वेळोवेळी निवडक ग्रंथांचा परिचय करून दिला आहे. पुणे-कार्यवृत्त लेखन – प्रमुख कार्यवाहांकरिता – दीपक करंदीकर यांनी केले आहे.)

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**
संपादक
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, पुणे


रेग्युलेशन ऑफ न्यूजपेपर्स (सेन्ट्रल रुल्स १९५६ नियम क्र. ८ अन्वये) 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका'ची मालकी व इतर तपशिलासंबंधी.

**निवेदन**

| | | |
|---|---|---|
| **नियतकालिकाचे नाव** | | 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' |
| **प्रसिद्धीचा काळ/भाषा** | : | त्रैमासिक/मराठी |
| **संपादक** | | डॉ. सुधाकर प्रल्हाद कुलकर्णी,<br>'सूर', ७ गायकवाड वसाहत,<br>सावेडी मार्ग, अहमदनगर ४१४००३ |
| **राष्ट्रीयत्व** | | भारतीय |
| **प्रकाशक** | : | प्रकाश पायगुडे,<br>प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद,<br>टिळक मार्ग, पुणे ३०. |
| **राष्ट्रीयत्व** | : | भारतीय |
| **मुद्रक** | : | स्मिता प्रिंटर्स,<br>१०१९, सदाशिव पेठ, पुणे ३०. |
| **प्रकाशनस्थळ** | : | महाराष्ट्र साहित्य परिषद,<br>टिळक मार्ग, पुणे ४११०३०<br>(महाराष्ट्र राज्य - भारत)<br>दूरभाष : ०२०/२४४७५९६३ |

मी, प्रकाश पायगुडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद टिळक मार्ग, पुणे ४११०३० असे जाहीर करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे खरा व बरोबर आहे.

**प्रकाश पायगुडे** (प्रकाशक)

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे आणि विविध शाखांचे कार्यवृत्त
(दि. १६ मार्च २०१३ ते १५ ऑगस्ट २०१३)

## — पुणे शहर —

**१) दि. १६ मार्च २०१३ : दिवाळी अंक — २०१२ स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ :** डॉ. सदानंद बोरसे यांच्या अध्यक्षतेखाली यंदाच्या दिवाळी अंक २०१२ स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ पार पडला. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. डॉ. वैद्य व सुनील महाजन यांच्या हस्ते डॉ. सदानंद बोरसे, डॉ. मेधा सिधये, डॉ. वर्षा तोडमल, चंद्रकांत शेवाळे व मीनाक्षी केळकर यांचे स्वागत व सत्कार करण्यात आले. डॉ. मेधा सिधये यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. डॉ. बोरसे यांच्या हस्ते पारितोषिक वितरण करण्यात आले. विजेत्यांपैकी 'अक्षर'चे संपादक– हेमंत कर्णिक व राजकुमार तांगडे यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. सदानंद बोरसे यांनी आपले विचार प्रकट केले. सूत्रसंचालन कार्यवाह महेंद्र मुंजाळ यांनी केले.

**दिवाळी अंक — २०१२ स्पर्धेचा निकाल :**

१) अ. स. गोखले स्मृत्यर्थ 'रत्नाकर पारितोषिक' अंक : अक्षर

२) चंद्रकांत शेवाळे पुरस्कृत ३ पारितोषिके :

अ. 'विविध ज्ञानविस्तारकर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक अंक : आपले छंद

ब. 'मासिक मनोरंजनकार का. र. मित्र पारितोषिक अंक : कालनिर्णय

क. 'शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक अंक : वनराई

३) कै. जानकीबाई केळकर स्मृत्यर्थ उत्कृष्ट बालवाङ्मय दिवाळी विशेष अंक : 'ऋग्वेद'

४) दिवाळी अंकातील उत्कृष्ट कथेबद्दल 'दि. अ. सोनटक्के पारितोषिक' कथा : 'कातडी'
लेखक : राजकुमार तांगडे
अंक : अक्षर

५) दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखासाठी
लेख : 'मी सखा मेघदूत'
अनंत काणेकर पारितोषिक लेखक : सौ. हर्षदा सुनील पंडित
अंक : विशाखा

परीक्षक : डॉ. मेधा सिधये, डॉ. वर्षा तोडमल

* या स्पर्धेत १२८ दिवाळी अंक स्पर्धेसाठी परिषदेकडे प्राप्त झाले होते. त्यातून वरील अंकांची निवड परीक्षकांनी केली.

**२) दि. २८ मार्च २०१३ : सुहासिनी इर्लेकर पुरस्कारवितरण सोहळा :** प्रियंका डहाळे यांच्या 'अनावृत्तरेषा' या कवितासंग्रहास संदीप खरे यांच्या हस्ते देण्यात आला. प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. संदीप खरे व यशवंत इर्लेकर यांना वैद्य यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते परीक्षक मनोहर सोनवणे व अंजली कुलकर्णी यांना पुष्पगुच्छ देऊन गौरविण्यात आले. यानंतर या दोन्ही परीक्षकांनी आपले मनोगत व्यक्त केल्यानंतर पुरस्कार वितरण करण्यात आले. पुरस्कार विजेत्या प्रियंका डहाळे यांनी मनोगत व्यक्त केले. संदीप खरे यांनी अध्यक्षीय समारोप केला. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले व कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले.



अनुक्रमणिका

**३) दि. ३० मार्च २०१३ : पुष्पा पुसाळकर स्मरणार्थ उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीस पुरस्कार :** यंदाच्या वर्षीचा हा पुरस्कार कॉन्टिनेंटल प्रकाशनला 'तुझ्यावरच्या कविता' या संदीप खरे यांच्या पुस्तकाला अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. ज्येष्ठ साहित्यिक राजेंद्र बनहट्टी यांच्या पंचाहत्तरीनिमित्त परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला. यावेळी कार्याध्यक्ष प्रमुख कार्यवाह व कोषाध्यक्ष उपस्थित होते. कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी सूत्रसंचालन केले. प्रकाशनाच्या देवयानी अभ्यंकर यांनी हा पुरस्कार स्वीकारला.

**४) दि. ९ एप्रिल २०१३ : शं. ना. जोशी स्मरणार्थ पुरस्कारवितरण समारंभ :** डॉ. नभा काकडे यांच्या 'बुधभूषण-एक चिकित्सा' या ग्रंथाला यंदाचा, ज्येष्ठ इतिहास संशोधक कै. शं. ना. जोशी यांच्या स्मरणार्थ, पुरस्कार देण्याचा कार्यक्रम झाला. हा पुरस्कार डॉ. श्रीपाद भट यांच्या हस्ते डॉ. काकडे यांना देण्यात आला. डॉ. सदाशिव शिवदे हे प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. त्याचप्रमाणे डॉ. अमोल विद्यासागर व डॉ. संभाजी भोसले या दोघांनी या ग्रंथाचे परीक्षण केले होते. हे दोघेही उपस्थित होते. तसेच शं. ना. जोशी परिवारापैकी श्री. मो. शं. जोशी व श्री. बा. शं. जोशी हे दोघे व डॉ. नभा काकडे यांचे कुटुंबीय उपस्थित होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक केले. अध्यक्ष व प्रमुख पाहुणे यांचा पुष्पगुच्छ देऊन सत्कार केला. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांच्या हस्ते जोशी बंधू व परीक्षकद्वय यांचे सत्कार करण्यात आले. डॉ. भट, डॉ. शिवदे, डॉ. काकडे यांचा परिचय कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी करून दिला. डॉ. श्रीपाद भट यांच्या हस्ते डॉ. नभा काकडे यांना पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. नभा काकडे यांनी मनोगत व्यक्त केले. परीक्षकांपैकी डॉ. संभाजी भोसले यांनी मनोगत व्यक्त केले. यानंतर डॉ. भट व डॉ. शिवदे यांची भाषणे झाली. सूत्रसंचालन प्रकाश पायगुडे यांनी केले व सुनील महाजन यांनी आभार मानले.

**५) दि. १० एप्रिल २०१३ : ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन :** दरवर्षीप्रमाणे पुण्यातील कमला नेहरू उद्यानातील केतकरांच्या समाधीला पुष्पांजली वाहण्याचा कार्यक्रम सकाळी ८॥ वाजता आयोजित केला होता. श्याम भुर्के यांनी केतकरांच्या जीवनचरित्राचा आढावा थोडक्यात घेतला व समाधीला पुष्पहार अर्पण केला. उपस्थितांनी पुष्पांजली वाहिली. डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन, डॉ. कल्याणी दिवेकर, दीपक करंदीकर व स्थानिक नगरसेविका माधुरी सहस्रबुद्धे याप्रसंगी उपस्थित होते.

**६) दि. ११ एप्रिल २०१३ :** अ. भा. सा. महामंडळाच्या कार्यालयाचे उद्घाटन आज गुढीपाडव्याच्या निमित्ताने श्री. म. श्री. दीक्षित यांच्या हस्ते करण्यात आले. यावेळी व्यासपीठावर राजेंद्र बनहट्टी, रा. ग. जाधव, डॉ. रावसाहेब कसबे, व डॉ. माधवी वैद्य हे उपस्थित होते. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. महामंडळाच्या कार्यालयाच्या फलकाचे अनावरण झाले. उपस्थितांचे सत्कार करण्यात आले. त्यांनी यानिमित्ताने मनोगते व्यक्त केली. प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांनी अध्यक्षीय समारोप केला. प्रमुख कार्यवाह प्रा. मिलिंद जोशी यांनी मनोगत व्यक्त केले. कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी आभार मानले. याप्रसंगी पेढेवाटप करण्यात आले.

**७) दि. १७ एप्रिल २०१३ : डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती :** प्रा. रामनाथ चव्हाण यांचा कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते षष्ठ्यब्दीपूर्तीनिमित्त हृद्य सत्कार करण्यात आला. शाल, श्रीफल व पुष्पगुच्छ देण्यात आला. त्यांचे 'डॉ. आंबेडकरांना अभिप्रेत समाजपरिवर्तन' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक डॉ. माधवी वैद्य यांनी केले. वक्त्यांचा परिचय सुनील महाजन यांनी करून

दिला. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

**८) दि. २० व २१ एप्रिल २०१३ :** जनवाणी संस्था आणि म. सा. प. यांच्या संयुक्त विद्यमाने 'वारसा सप्ताह' आणि 'जागतिक ग्रंथदिन' (२३ एप्रिल) यानिमित्ताने परिषदेच्या आपटे ग्रंथालयातील दुर्मिळ पुस्तकांचे प्रदर्शन दोन दिवसांसाठी भरवण्यात आले. ज्येष्ठ समीक्षक प्रा. के. रं. शिरवाडकर यांच्या हस्ते या ग्रंथप्रदर्शनाचे उद्घाटन झाले. यावेळी डॉ. न. म. जोशी कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, कोषाध्यक्ष सुनील महाजन, कार्यवाह महेंद्र मुंजाळ हे उपस्थित होते. परिषदेच्या ग्रंथालयातील सेवकवर्ग व श्री. मुंजाळ यांच्या परिश्रमामुळे या दुर्मिळ ग्रंथांच्या प्रदर्शनाला दोन दिवसांत ग्रंथप्रेमींनी भेट दिली.

**९) दि. २३ एप्रिल २०१३ : नाट्यविभाग :** योगेश सोमण यांच्या नवीन नाटकाचे नाट्यवाचन आयोजित केले होते. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य, कोषाध्यक्ष सुनील महाजन यांची प्रमुख उपस्थिती होती. एकदा पाहावं न करून' या स्वलिखित नाटकाचे वाचन स्वत: योगेश सोमण यांनी केले. हे नाटक पुढे व्यावसायिक रंगभूमीवर येणार असल्याची माहिती त्यांनी याप्रसंगी दिली. अनेक रंगकर्मी व नाट्यरसिक उपस्थित होते.

**१०) दि. २६ एप्रिल २०१३ : कृष्ण मुकुंद पुरस्कार वितरण समारंभ :** पद्मश्री प्रा. मधुकर ढवळीकर यांच्या 'महाराष्ट्राची कुळकथा' या ग्रंथाला डॉ. प्र. ल. गावडे यांच्या हस्ते यंदाचा 'कृष्णमुकुंद पुरस्कार' प्रदान करण्यात आला. डॉ. सुधीर उजळंबकर यांनी प्रा. मधुकर ढवळीकर यांचा परिचय करून दिला. ज्ञानदा देशपांडे यांनी कृष्ण मुकुंद उजळंबकर यांच्याविषयी परिचयात्मक माहिती दिली. स्वागत व प्रास्ताविक कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी केले. पद्मश्री प्रा. डॉ. ढवळीकर यांना पुरस्कार प्रदान करण्यात आला. त्या अगोदर डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. नलिनी गुजराथी, श्री. मोहन गुजराथी, मुकुंद उजळंबकर या सर्वांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत-सत्कार डॉ. वैद्य व श्री. महाजन यांच्या हस्ते करण्यात आले. ज्ञानदा देशपांडे यांनाही डॉ. गावडे यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देण्यात आला. नंतर पुरस्कार विजेते पद्मश्री ढवळीकर यांचे मनोगत झाले. अध्यक्षीय समारोप डॉ. प्र. ल. गावडे यांनी केला. सुनील महाजन यांनी आभार मानले व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**११) दि. ८ मे २०१३ :** संपादकांची बैठक : सकाळी ११ ते १

**१२) दि. २६ व २७ मे २०१३ : महाराष्ट्र साहित्य परिषदेचा वर्धापनदिन :** दरवर्षीप्रमाणे दि. २७ मे च्या पूर्वसंध्येला म्हणजे २६ मे २०१३ रोजी परिषदेच्या वर्धापनदिनानिमित्त 'वार्षिक ग्रंथ आणि ग्रंथकार पारितोषिक वितरण समारंभ मा. श्रीनिवास पाटील यांच्या प्रमुख उपस्थितीत व डॉ. प्र. चिं शेजवलकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाला. सुनीती लिमये यांनी शारदास्तवन सादर केले. प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले. मान्यवरांचे पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांनी वर्धापनदिनानिमित्त 'विशेष सत्कारार्थी'विषयी माहिती दिली. अध्यक्षांचे हस्ते म. श्री. दीक्षित, डॉ. वि. भा. देशपांडे व श्री. ह. ल. निपुणगे या तीन विशेष सत्कारार्थींचे, परिषदेला त्यांनी दिलेल्या योगदानाबद्दल पुष्पगुच्छ श्रीफळ व स्मृतिचिन्हे देऊन सत्कार करण्यात आला. प्रमुख पाहुणे मा. श्रीनिवास पाटील यांचा परिचय कोषाध्यक्ष सुनील महाजन यांनी करून दिला. त्यांच्या हस्ते सुमारे ३० पुरस्कार प्रदान करण्यात आले. (या सर्व ग्रंथ पारितोषिके व ग्रंथपुरस्कार विजेत्यांची यादी सोबत जोडली आहे.) डॉ. मुहम्मद आज़म व अरविंद व्यं. गोखले या पुरस्कार विजेत्यांची प्रातिनिधिक भाषणे या निमित्ताने झाली. सध्या बोकाळलेल्या 'नक्षलवादा'विषयीची माहिती



अनुक्रमणिका

श्री. गोखले यांनी सभेला दिली. यानंतर श्रीनिवास पाटील यांचे भाषण झाले व शेवटी डॉ. शेजवलकरांनी अध्यक्षीय समारोप केला. महेंद्र मुंजाळ यांनी आभार मानले व कार्यवाह नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. दि. २७ मे रोजी सायंकाळी १०७ व्या वर्धापन दिनाचा समारंभ प्रमुख पाहुणे मा. डॉ. सदानंद मोरे यांच्या उपस्थितीत पार पडला. वर्धापनदिनी दिला जाणारा महाराष्ट्र साहित्य परिषदेचा 'सन्मान' पुरस्कार ज्येष्ठ कवी पद्मभूषण मंगेश पाडगावकर यांना प्रदान करण्यात आला. तसेच 'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार' डॉ. अशोक कामत यांना प्रदान करण्यात आला. सूत्रसंचालन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

**१३) दि. २२ जून २०१३ : नवं कोरं :** या कार्यक्रमांतर्गत 'गोष्टी लग्नाच्या कल्पनेपलीकडच्या डॉक्टरी सत्यकथा' या डॉ. अरविंद संगमनेरकर यांच्या पुस्तकाचे स्वागत व चर्चा असा कार्यक्रम झाला. महामंडळाच्या अध्यक्ष आणि परिषदेच्या कार्याध्यक्ष यांनी या पुस्तकावरचे आपले विचार प्रकट केले. त्यानंतर उपस्थित श्रोतृवर्ग व अभ्यासक यांच्यात मराठी साहित्यात नव्याने आलेले 'वैद्यक साहित्य' या विषयावर चर्चा झाली. समारंभाचे अध्यक्ष प्रा. डॉ. सदानंद मोरे यांनी 'मराठी साहित्यातील नवे प्रवाह' या विषयावर अध्यक्षीय विचार प्रकट केले. प्रास्ताविक प्रकाश पायगुडे, व आभार नंदा सुर्वे यांनी मानले. सुनील महाजन यांनी स्वागत-सत्कार केले.

**१४) दि. २४ जून २०१३ : श्रद्धांजली सभा :** प्रा. श्रीधर राजगुरू, प्रभाकर वाडेकर, व ह. अ. भावे या तिघांना श्रद्धांजली वाहण्यासाठी सभा झाली. सतीश आळेकर, श्रीरंग गोडबोले, श्रीराम रानडे, सुधीर गाडगीळ, डॉ. न. म. जोशी, दत्ता टोळ, चारुदास पंडित, अरुण जाखडे इत्यादींनी आपले श्रद्धांजलीपर विचार प्रकट केले. अध्यक्षस्थानी डॉ. माधवी वैद्य होत्या.

**१५) दि. ६ जुलै २०१३ : नाट्यविभाग :** परिषद व भारती विद्यापीठ, पुणे यांच्या संयुक्त महाराष्ट्र साहित्य विद्यमाने 'युवा साहित्य नाट्यसंमेलनांतर्गत' संहिता ते नाट्यप्रयोग : एक कलाप्रवास या विषयावर ज्येष्ठ रंगकर्मी व दिग्दर्शिका विजया मेहता यांच्याशी दिग्दर्शिका प्रतिमा कुलकर्णी यांनी संवाद साधला. याचवेळी पुष्पलता रानडे पुरस्कृत लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक परिषदेचे अध्यक्ष डॉ. प्र.चिं. शेजवलकर यांच्या हस्ते प्रदान करण्यात आले. कार्यवाह नंदा सुर्वे यांनी सूत्रसंचालन केले. यावेळी व्यासपीठावर डॉ. माधवी वैद्य, सुनील महाजन व प्रकाश पायगुडे उपस्थित होते. मुलाखतीनंतर विजया मेहता दिग्दर्शित 'हमीदाबाईची कोठी' ही टेलिफिल्म दाखविण्यात आली. ह्या कार्यक्रमास नाट्य रसिकांची भरपूर गर्दी होती.

**१६) दि. ९ जुलै २०१३ :** डॉ. म.वि. गोखले पुरस्कृत 'प्रा. शं.वा. तथा सोनोपंत दांडेकर पुरस्कार वितरण समारंभ डॉ. माधवी वैद्य यांच्या अध्यक्षतेखाली झाला. प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले व परीक्षक डॉ. केतकी मोडक व डॉ. गौरी भागवत यांचा स्वागत-सत्कार केला. डॉ. गौरी भागवत यांनी परीक्षकांचा अभिप्राय व्यक्त केला. डॉ. उदय कुमठेकर यांच्या 'जैनदर्शन' या प्रसाद प्रकाशन, पुणे या संस्थेच्या ग्रंथास हा पुरस्कार डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. पुरस्कार विजेते डॉ. उदय कुमठेकर यांनी आपले मनोगत व्यक्त केले. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले व कार्यवाह दीपक करंदीकर यांनी आभार मानले.

**१७) दि. १० जुलै २०१३ : थोर साहित्यिक जी.ए. कुलकर्णी स्मृतिप्रीत्यर्थ व्याख्यान :** 'मराठी कथेपुढची आव्हाने' या विषयावर भानू काळे यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक व स्वागत कार्याध्यक्ष

डॉ. माधवी वैद्य यांनी केले. वक्त्यांचा परिचय सुनील महाजन यांनी करून दिला. आभार प्रदर्शन प्रकाश पायगुडे यांनी केले व सूत्रसंचालन दीपक करंदीकर यांनी केले. जी.ए. कुलकर्णीच्या भगिनी श्रीमती नंदा पैठणकर यांचा पुष्पगुच्छ देऊन स्वागत करण्यात आला. यानिमित्ताने त्यांनी विचार प्रकट केले.

**१८) दि. १५ जुलै २०१३ :** प्रा. बाबूराव शिरोळे आणि शांता शिरोळे पुरस्कार वितरणसमारंभ डॉ. माधवी वैद्य यांनी प्रास्ताविक व स्वागत केले. डॉ. प्रतिमा इंगोले यांच्या हस्ते लेखिका सौ. रेखा बैजल यांना शांतादेवी शिरोळे लेखिका पुरस्कार प्रदान करण्यात आला, तसेच प्रा. बाबूराव शिरोळे बालसाहित्यकार पुरस्कार राजीव तांबे यांना जाहीर झाला. कार्यवाह डॉ. कल्याणी दिवेकर यांनी सूत्रसंचालन केले व नंदा सुर्वे यांनी आभार मानले.

**१९) दि. १८ जुलै २०१३ : लोकशाहीर अण्णाभाऊ साठे स्मृतिदिन व्याख्यान :** परिषद आणि दलित साहित्य परिषद यांच्या संयुक्तविद्यमाने 'अण्णाभाऊ साठे : जीवन आणि कार्य' या विषयावर डॉ. संदीप सांगळे यांचे व्याख्यान झाले. दलितपरिषदेचे अध्यक्ष दुर्योधन अहिरे व परिषदेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी प्रास्ताविक केले. बाळ आल्हाट यांनी वक्त्यांचा परिचय करून दिला व आभार मानले. कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सूत्रसंचालन केले.

**२०) दि. २० जुलै २०१३ :** ज्येष्ठ क्रिकेटपटू चंदू बोर्डे यांनी ८०व्या वर्षांत पदार्पण केले त्या निमित्ताने परिषदेतर्फे त्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला.

**२१) दि. २५ जुलै २०१३ : ज्येष्ठ साहित्यिक कै. वा. म. जोशी स्मृतिदिन :** डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांचे 'कादंबरीकार वामन मल्हार जोशी' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक व स्वागत प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांनी केले. वक्त्यांचा परिचय, सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन कार्यवाह दीपक करंदीकर यांनी केले.

**२२) दि. ५ ऑगस्ट २०१३ : संत सावतामाळी पुण्यतिथी :** 'अंतरंग, पुणे' या संस्थेच्यावतीने 'भक्तीचा मळा' हा भक्तिगीतांवर आधारित संगीतमय कार्यक्रम सादर करण्यात आला. प्रास्ताविक प्रकाश पायगुडे यांनी केले. कार्याध्यक्ष डॉ. माधवी वैद्य यांच्या हस्ते पुष्पगुच्छ व गुलाबफुल देऊन कार्यक्रमातील सहभागी सर्व कलावंतांचे स्वागत करण्यात आले. सूत्रसंचालन व आभार प्रदर्शन दीपक करंदीकर यांनी केले. या कार्यक्रमाची संकल्पना व निवेदन सौ. प्राची घोटकर यांचे होते. डॉ. लीना राजवाडे, नीला दीक्षित, पूर्वा घोटकर, ऋतुज घोटगे या गायिका व गायकांनी अनेक सुप्रसिद्ध भक्तिगीते सादर केली. त्यांना माधवी करंदीकर यांनी हार्मोनियमवर व निवेदिता मेहेंदळे आणि सौरभ कट्टी यांनी तबल्यावर साथसंगत केली. रसिकांची भरपूर उपस्थिती व दाद या कार्यक्रमाला मिळाली.

**२३) दि. १४ ऑगस्ट २०१३ : डॉ.गं.ना. जोगळेकर स्मृतिदिन :** या दिवशी सकाळी १०वा. डॉ. रा.चिं. ढेरे यांच्या निवासस्थानी जाऊन त्यांना 'डॉ. गं.ना. जोगळेकर स्मृति-पुरस्कार प्रदान करण्यात आला. याप्रसंगी ढेरे परिवार, जोगळेकर परिवार व परिषदेचे पदाधिकारी उपस्थित होते. याचदिवशी सायंकाळी 'मातृभाषेतून शिक्षण : युवकांची भूमिका' या विषयावर महाविद्यालयीन विद्यार्थि-विद्यार्थिनींची चर्चा आयोजित करण्यात आली होती. यात प्रणव बापट व धैसास इत्यादींनी सहभाग घेतला.

***

## – म. सा. प. शाखा पिंपरी-चिंचवड –

**१) दि. ५ जानेवारी २०१३ :** 'गुलजार एक साहित्य विचार' या विषयावर डॉ. सविता सिंग व माध्यमांपुढील आव्हाने या विषयावर अपर्णा मोहिले यांची व्याख्याने झाली. अध्यक्षस्थान श्री. चंद्रभान गर्ग यांनी भूषविले. प्रास्ताविक अध्यक्ष राजन लाखे यांनी केले. सूत्रसंचालन सुहास घुमरे यांनी केले.

**२) दि. १७ फेब्रुवारी २०१३ :** दासबोधावर आधारित 'अध्यात्म-एक मन:शांतीचा मार्ग' या विषयावर चर्चा झाली. या निमित्ताने डॉ. माधवी महाजन यांनी आपले विचार मांडले. प्रास्ताविक राजन लाखे यांनी केले. माधुरी ओक, नितीन यादव, सुहास पोफळे, तुकाराम पाटील यांनी या चर्चेच्या कायेक्रमाचे संयोजन केले.

**३) दि. ३ मार्च २०१३ :** मसाप पिंपरी-चिंचवड शाखा व नोव्हेल इन्स्टिटयूट ऑफ मॅनेजमेंट यांच्या संयुक्त विद्यमाने महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी वक्तृत्व स्पर्धा आयोजिली होती. स्पर्धेत सुमारे २५ विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला. परीक्षक म्हणून प्रा. अपर्णा पांडे व संजय पायगुडे यांनी काम केले. सूत्रसंचालन वैभव गोडसे यांनी केले. राजन लाखे यांनी स्पर्धेची माहिती दिली. विजेत्यांना परीक्षकांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली.

**४) दि. २४ मार्च २०१३ -** एकदिवसीय साहित्य संमेलन - मा. महापौर मोहिनीताई लांडे यांच्या हस्ते संमेलनाचे उद्घाटन झाले. अध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले होते. दिवसभर परिसंवाद, पथनाट्य, मुलाखत कविसंमेलन असे विविध कार्यक्रम झाले.

---

## – म. सा. प. शाखा जुळे सोलापूर –

**१) दि. १४/१२/१२ :** गदिमा स्मृतिदिन (वृक्षारोपण) - स्मृतिवनात कवी नारायण कुलकर्णी यांचे हस्ते वटवृक्षारोपण करण्यात आले. कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी 'गदिमांच्या आठवणी' वाचून दाखवल्या. प्रास्ताविक अध्यक्ष वासुदेव रायते यांनी केले.

**२) दि. १७/१२/१२ :** डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांचा सपत्नीक सत्कार - शाखा व संतसेवा वाचनालय यांचे संयुक्त विद्यमाने ८६व्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाल्याबद्दल सत्कार करण्यात आला. डॉ. गो. मा. पवार, डॉ. वासुदेव रायते, सुधाकर जोशी, म. भि. नाईक, शिवशरण पाटील, नारायण कुलकर्णी इत्यादी मान्यवर उपस्थित होते. सूत्रसंचालन कार्यवाह प्रशांत जोशी यांनी केले. आभार गिरीश दुनाखे यांनी मानले.

**३) दि. २६ जानेवारी २०१३ :** प्रजासत्ताक दिन कविसंमेलन - डॉ. नसीमा पठाण, बदीऊज्जमा बिराजदार, गिरीश दुनाखे, मारुती कटकधोंड, देवेंद्र औटी, रेणुका बुधाराम, शांता क्षीरसागर, राजेंद्र भोसले, गोविंद काळे, पुरुषोत्तम नगरकर, आशा पाटील आदींनी कविसंमेलनात सहभाग घेतला. माधव पवार यांनी सूत्रसंचालन केले. प्रशांत जोशी यांनी आभार मानले. प्रास्ताविक डॉ. वासुदेव रायते यांनी केले.

**४) दि. २७ फेब्रुवारी २०१३ :** मराठी दिनानिमित्त हास्य व प्रेमकवितांची मैफल - नारायण कुलकर्णी व माधव पवार, श्री. सुनील शिनखेडे, यांनी त्यांच्या रचना सादर केल्या. प्रास्तविक कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी केले. अध्यक्षस्थानी डॉ. वासुदेव रायते होते. हा कार्यक्रम लोकमंगल सार्वजनिक वाचनालय यांच्या सहकार्याने आयोजिला होता.

**५) दि. १७ मार्च २०१३ :** जागतिक महिला दिनानिमित्त व्याख्यान - "विवेकानंदांनी सांगितलेला

मातृभाव'' या विषयावर सौ. स्नेहा शिनखेडे यांचे व्याख्यान झाले. महापौर अलका राठोड अध्यक्षस्थानी होत्या. प्रास्ताविक शांता क्षीरसागर व आभार गिरीश दुनाखे यांनी केले.

**६) दि. २६ मार्च २०१३ :** कवी ग्रेस स्मृतिदिन - 'कवी ग्रेस यांच्या आठवणी' या विषयावर प्रा. डॉ. सुहास पुजारी व प्रा. मनोज कुलकर्णी यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक कार्यवाह गिरीश दुनाखे यांनी केले.

**७) दि. ९ जून २०१३ :** दत्ता हलसगीकर प्रथम स्मृतिदिन - धर्मवीर संभाजी तलाव ते सोरेगाव या रस्त्याला 'कविवर्य दत्ता हलसगीकर पथ' असे नामकरण करण्यात आले. तसेच 'उंची' ही कविवर्य हलसगीकर यांची कविता शिल्परूपात प्रस्थापित करण्यात आली. महापौर सौ. राठोड व सभागृह नेते महेश कोठे यांचे हस्ते हे कार्यक्रम झाले. प्रास्ताविक अध्यक्ष डॉ. वासुदेव रायते व सूत्रसंचालन प्रशांत जोशी व आभार गिरीश दुनाखे यांनी मानले.

---

## — म. सा. प. मावळ शाखा —

**१) दि. १५ जून २०१३ :** श्री. विवेक सावंत यांचे आधुनिक माहिती - तंत्रज्ञानाच्या संदर्भात 'मराठी भाषेचे भवितव्य' या विषयावर भाषण झाले. प्रास्ताविक अध्यक्ष सुरेश अत्रे यांनी केले. वक्त्यांचा परिचय उपाध्यक्षा सौ. यशोधरा साठे यांनी करून दिला. सूत्रसंचालन कार्यवाह सतीश साठे यांनी केले. याच वेळी डॉ. माधवी वैद्य, प्रकाश पायगुडे व सुनील महाजन यांनी अ. भा. म. साहित्य महामंडळावर निवड झाल्यानिमित्त सत्कार करण्यात आले. प्रारंभी 'चिंटू'चे लेखक प्रभाकर वाडेकर यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

---

## — म. सा. प. शाखा इस्लामपूर —

**१) ८ ऑगस्ट २०१२ :** २०वे एकदिवसीय साहित्य संमेलन - डॉ. तारा भवाळकर या अध्यक्षस्थानी होत्या. उद्घाटन प्रा. वैजनाथ महाजन यांच्या हस्ते झाले. स्वागताध्यक्ष श्री. टी. ए. पाटील होते. संतसाहित्यावर परिसंवाद झाला. कविसंमेलन झाले. अध्यक्ष रमजान मुल्ला होते. प्रास्ताविक व स्वागत डॉ. दीपा देशपांडे यांनी केले. आभार प्रा. दशरथ पाटील यांनी मानले.

**२) दि. १८ ऑगस्ट २०१२ :** डॉ. शिवाजीराव घोरपडे स्मृतिदिन - 'रक्तदान : एक वाढती समस्या' या विषयावर डॉ. शिरीष चव्हाण यांचे भाषण झाले.

**३) दि. २७ ऑक्टोबर २०१२ :** शाखा मेळावा - वसंत आबाजी डहाके यांच्या हस्ते उद्घाटन झाले. प्रास्ताविक पद्माकर कुलकर्णी यांनी केले. स्वागत डॉ. दीपा देशपांडे व आभार डॉ. मंगल कोकाटे यांनी मानले.

**४) दि. १४ नोव्हेंबर २०१२ :** दीपावली पहाट - 'सूर पहाटेचे स्वर गांधार' हा सतीश पाटील यांचा मराठी सुगम गायन संगीत हा कार्यक्रम साजरा झाला.

**५) दि. १० डिसेंबर २०१२ :** आचार्य जावडेकर स्मृतिदिन - 'जागतिकीकरण' या विषयावर प्रा. सचिन गरुड यांचे व्याख्यान झाले. प्रास्ताविक प्रा. शामराव पाटील यांनी केले व आभार वृषाली आफळे यांनी मानले.

**६) दि. २८ फेब्रुवारी २०१३ :** ग्रंथ प्रकाशन सोहळा - श्री. नारायण बळवंत तथा श्रीमंत दादासाहेब मंत्री यांच्या 'जीवन-तरंग' या आत्मचरित्राचे प्रकाशन श्रीमंत बाबासाहेब पुरंदरे यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थान



अनुक्रमणिका

प्रा. द. मा. मिरासदार यांनी भूषविले. आभार मंगल कोकाटे यांनी मानले.

**७) दि. ३१ मार्च २०१३ :** डॉ. विवेक देशपांडे स्मृतिदिन - 'वेदकाळातील स्त्रीरत्ने' या विषयावर प्रा. डॉ. मंजुषा कुलकर्णी यांचे व्याख्यान झाले. प्रा. शामराव पाटील यांनी प्रास्ताविक केले. प्रा. दशरथ पाटील यांनी स्वागत केले. व सौ. वृषाली आफळे यांनी आभार मानले.

**८) दि. ११ मे २०१३ : ग्रंथ प्रकाशन सोहळा-** डॉ. मधुकर हसमनीस व लक्ष्मण हसमनीस यांच्या 'धुक्यातील झाड' या पुस्तकाचे प्रकाशन झाले. प्रास्ताविक प्रा. शामराव पाटील, आभार डॉ. दीपा देशपांडे यांनी मानले. अध्यक्ष प्रा. विश्वास सायनाकर होते.

**९) दि. ६ जून २०१३ :** मसाप इस्लामपूर शाखेचा वर्धापन दिन साजरा करण्यात आला.

**१०) दि. १४ जुलै २०१३ :** प्रा. शरद भोसले स्मृतिदिन - प्रा. सुनीता लेंगडे यांचे 'संतांनी समाजाला काय दिले?' या विषयावर व्याख्यान झाले. प्रास्ताविक व स्वागत प्रा. दीपा देशपांडे यांनी केले. डॉ. मंगल कोकाटे यांनी आभार मानले.

**११) दि. १६ जुलै २०१३ :** लेखिका माधवी देसाई व सिनेकलावंत प्राण श्रद्धांजली सभा - या दोघांना भावपूर्ण श्रद्धांजली वाहण्यात आली. शाखेचे सर्व सभासद उपस्थित होते. प्रास्ताविक डॉ. दीपा देशपांडे यांनी केले. प्रा. वि. द. कदम यांनी आभार मानले.

***

**प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे**
नोंद व संकलन : दीपक करंदीकर
स्थानिक कार्यवाह, म. सा. प. पुणे
पुणे शहर आणि विविध शाखा

---

## म.सा.प.च्या उत्कृष्ट कार्यकर्त्यास 'रत्नाकर कुलकर्णी स्मरणार्थ पुरस्कार



१९९५ पासून परिषदेवर निवडून आलेल्या एका अतिशय चोख आणि हसतमुख कार्यकर्त्याने पहिली तीन वर्षे कार्यवाह म्हणून अत्यंत चोख काम करून त्यावेळेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्यापासून सर्वांचे मन जिंकले. त्यानंतर सलग अकरा वर्षे त्यांनी कोषाध्यक्ष म्हणून काम केले. कॉन्टिनेंटल प्रकाशनातील तीस-पस्तीस वर्षांच्या कामाचा त्यांना इथेही खूप उपयोग झाला. परिषदेचे सर्व आर्थिक व्यवहार त्यांनी काटेकोरपणे सांभाळले आणि अनेक प्रकारे परिषदेला आर्थिक स्थैर्य आणून देण्याचे काम केले.

त्यांच्या आनंदी आणि गप्पिष्ट स्वभावाने ते परिषदेत सर्वांना हवेहवेसे वाटत असत. रत्नाकर कुलकर्णी यांचे १७ सप्टेंबर २०१३ ला वयाच्या अवघ्या ६५ व्या वर्षी दु:खद निधन झाले. त्यावेळी परिषदेसह अख्खे साहित्यविश्व हळहळले.

त्यांच्या प्रथम स्मृतिदिनानिमित्त, १७ सप्टेंबर २०१४ रोजी, त्यांच्या पत्नी श्रीमती अनुराधा (सुवर्णा) यांनी परिषदेकडे एक लाख रुपयांची कायमस्वरूपी ठेव ठेवली असून त्या रकमेच्या व्याजातून दरवर्षी म. सा. प. च्या शाखांमधील दोन सर्वोत्कृष्ट कार्यकर्त्यांना प्रत्येकी रुपये २५००/- चा पुरस्कार देण्यात येणार आहे. येत्या २७ मे २०१४ पासून त्याची सुरुवात होणार आहे.

या वेगळ्या आणि वैशिष्ट्यपूर्ण पुरस्काराने कै. रत्नाकर कुलकर्णी यांचे चिरंतन स्मरण परिषदेच्या सर्व संबंधितांना राहील; याबद्दल खात्री वाटते.

कै. रत्नाकर कुलकर्णी यांच्या कुटुंबियांचे या वेगळ्या पुरस्काराबद्दल अभिनंदन करायला हवे. कै. रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन!

***



अनुक्रमणिका

**(मागील अंक क्र. ३४७ मध्ये अशोक जैन यांच्याविषयी प्रसिद्ध केलेला लेख पुढीलप्रमाणे दुरुस्त करून पुनर्मुद्रित केला आहे. – संपादक)**

## 'कलंदर' पत्रकार - अशोक जैन



अनुवादक, ज्येष्ठ पत्रकार, 'म.टा.'चे दिल्लीतील बातमीदार– राजकीय विश्लेषक, 'कानोकानी' सारखे खुसखुशीत आणि मर्मग्राही स्तंभलेखक म्हणून ज्यांची ख्याती होती, पत्रकार अशोक जैन यांचे प्रदीर्घ आजारानंतर अंधेरी येथील 'ब्रह्मकुमारी हॉस्पिटल'मध्ये सत्तराव्या वर्षी दुःखद निधन झाले. अशोक जैन विशेष लोकप्रिय झाले ते त्यांच्या 'कानोकानी' ह्या सदरामुळे! 'कानोकानी' आणि 'आणखी कानोकानी' अशा दोन खंडात ते ग्रंथरूप झाले आहे. त्याला सर्वोत्कृष्ट विनोदी वाङ्मयाचा पुरस्कार लाभला. पंतप्रधान नरसिंह राव यांच्या आत्मचरित्राचा अनुवाद विशेष लोकप्रिय झाला. 'आणखी कानोकानी' मधील साहित्यिक खळखळाट 'आचार्य अत्रे यांची न झालेली भाषणे' हा लेख आचार्य अत्र्यांच्या उपरोधिक शैलीतील आणि मानवी स्वभावातील विसंगती दर्शविणारा आहे. कलाक्षेत्रातील– आर के लक्ष्मण ते मधुबाला यांच्यावरील टिपणे लक्षवेधी आहेत.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे तर्फे ह्या बहुआयामी पत्रकाराला श्रद्धांजली!

अशोक जैन एक माणूस म्हणून कसे श्रेष्ठ होते, त्यासंबंधीची आठवण, ज्येष्ठ लेखक, कादंबरीकार श्री. ह. मो. मराठे यांनी म.सा.पत्रिकेसाठी पाठविली आहे.

– संपादक

## संकटकाळी धावून आलेले - अशोक जैन

– ह. मो. मराठे

डेक्कनक्वीन पकडण्यासाठी घाईघाईने निघालो. रस्ता ओलांडून स्टेशनच्या बाजूच्या फूटपाथवर आलो. गाडी सुटायला पाच-सात मिनिटं उरली होती. म्हणून अधिकच घाई करीत होतो.

तेवढ्यात माझा पाय फूटपाथवर फेकण्यात आलेल्या केळ्यांच्या सालीवर पडला आणि तो सटकला. मी दाणदिशी फूटपाथवर पडलो. जोरात लागलं होतं. तरी मी तसाच उठून चालायचा प्रयत्न करू लागलो. पण मला उठता येईना. उभं राहाता येईना. त्यातच मला चक्कर आली. मी फूटपाथवरच आडवा होऊन पडलो.

आठ-दहा मिनिटं गेली असावी. मला शुद्ध आली. भोवती गर्दी जमली होती. गाडी तर चुकलीच होती. मी उठायचा प्रयत्न केला. पण जमेना.

आपला पायबीय मोडला असणार हे लक्षात आलं. आता काय बरं करावं? कोणाला मदतीसाठी हाक मारावी? काही क्षण विचार केला आणि खिशातलं व्हिजिटिंग कार्ड काढलं, गर्दीतल्या एका माणसासमोर धरून त्याला म्हणालो, "साहेब, मला प्लीज मदत करा. ते बघा. समोरच टाइम्स ऑफ इंडियाच्याच इमारतीत 'महाराष्ट्र टाइम्स' वर्तमानपत्राचं ऑफीस आहे. तिथं संपादकीय विभागात जा. तिथं कोणाही माणसाला हे कार्ड द्या आणि सांगा की व्हिजिटिंग कार्डवाला माणूस पाय घसरून इथं फूटपाथवर पडला आहे. त्याला उठता येत नाहीये. कोणाला तरी मदतीला बोलावलंय,"

सर्वात आधी धावत आले अशोक जैन. दोनतीन मिनिटांतच तिथं पोहोचले दि. वि. गोखले आणि चंद्रकांत

ताम्हाणे.

एकंदर परिस्थिती त्यांच्या लक्षात आली. त्यांनी मला शेजारच्या हॉस्पिटलमध्ये हलवलं आणि मुकुंदरावांना कळवलं. त्यांनी पुढली व्यवस्था केली.

दुसऱ्याची थट्टामस्करी (अर्थात, निर्मळ) करण्याचा अशोक जैनांचा स्वभावच होता. त्यांच्या 'कानोकानी' या म.टा. मधल्या लोकप्रिय सदरात त्यांनी एकदोनदा मलाही चिमटे काढले होते. पण ते वाचावे, हसावं आणि विसरून जावं, अशाच स्वरूपाचे होते.

म.टा. मधलं 'कानोकानी' हे सदर त्यांनी सुरू केलं ते म.टा.चे दिल्ली प्रतिनिधी ही जबाबदारी संपवून ते म. टा. च्या मुख्य कार्यालयात वरिष्ठ संपादक म्हणून परत आल्यावर.

जैन म.टा.चे दिल्ली प्रतिनिधी म्हणून बरीच वर्षे काम करीत होते. त्यावेळी त्यांनी लिहिलेली 'दिल्ली वार्तापत्रे' ही मराठी वृत्तपत्रीय लेखनाला मोठी देणगी आहे. ही त्यांची वार्तापत्रं रसाळ, खुसखुशीत आणि ललित शैलीत असत. 'दिल्ली वार्तापत्रे' सर्वच वर्तमानपत्रांत असतात. पण जैन यांनी त्या वार्तापत्रांची शैलीच बदलून टाकली हे त्यांचं मराठी पत्रकारितेला मोठंच योगदान होय!

थट्टेखोर पण उमदा स्वभाव असलेले जैन हे मराठीतले एक महत्त्वाचे पत्रकार गणले गेले. अशा माणसाला अर्धांगवायूने अंथरुणाला खिळवून ठेवावं आणि त्यातच त्यांचा मृत्यू व्हावा ही मात्र माणसाला न समजणारी दैवगती!

**ह. मो. मराठे**

**मो. नं. : ९४२३०१३८९२**

---

## अनुवादक, प्रकाशक इ. इ. बहुआयामी अशोक शहाणे यांचे अभिनंदन! ...

बंगाली भाषेचे जाणकार, अनियतकालिक चळवळीचे प्रणेते, 'प्रास' प्रकाशनचे संस्थापक, वितरक, मुद्रणकलेचे जाणकार आणि अनुवादक-साहित्यिक यांनी ऐंशीव्या वर्षात पदार्पण केले आहे. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन!

प्रारंभी 'सत्यकथे'साठी बंगाली कथांचे अनुवाद त्यांनी केले. बंगाली लोकप्रिय साहित्यिकांचे साहित्य मराठीत आणून, ते मराठी वाचकांशी जोडले. प्रास प्रकाशनातर्फे अरुण कोलटकरांचे 'जेजुरी', हे सर्वात महत्त्वाचे प्रकाशन.

'अथर्व' आणि 'असो' ह्या त्यांच्या अनियत–कालिकांनी सुरू केलेल्या चळवळीचे महाराष्ट्रात अनेक ठिकाणच्या साहित्यरसिकांनी अनुकरण केले. अहमदनगरला प्रसिद्ध चित्रकार श्रीधर अंभोरे यांनी 'आदिम' अनियतकालिक १९७५-७६ च्या सुमारास सुरू केले. ते स्वत: लिहीत आणि रेखाटनेही करीत. कवी चंद्रकांत पालवे, आजचे प्रसिद्ध नाट्य आणि चित्रपट अभिनेते श्री. सदाशिव अमरापूरकर आणि कवी सा. ब. आवारे हे 'आदिम'च्या संपादक मंडळात होते. राजन खान, राजेंद्र दास, कवी निरंजन उजगरे, कादंबरीकार प्रा. राजन गवस हे आजचे प्रसिद्ध लेखक, कवी ह्यांची उमेदवारी 'आदिम' पासूनच झाली आहे. त्यापूर्वी नगरचेच प्रसिद्ध कवी आणि आता 'ऋतुरंग' ह्या दिवाळी अंकाचे संपादक आणि प्रकाशक श्री. अरुण शेवते आणि दूरदर्शनचे रविराज गंधे ह्यांनी 'दिंडी' नावाचे अनियतकालिक याच सुमारास नगरलाच सुरू केले होते. 'दिंडी'च्या सहा अंकांसाठी व्यंकटेश माडगूळकरांनी स्टेन्सिलवर रेखाचित्रे काढली होती. वासुदेवराव बल्लाळ नावाच्या आमच्या मित्राच्या हस्ताक्षरात स्टेन्सिल-लेखन होत असे. उत्तम शिरवळकर, कवी नारायण सुमंत, टी. एन. परदेसी, डॉ. सु. प्र. कुलकर्णी, आणि डॉ. सदानंद मोरे यांचा यात सहभाग होता. ही दोन्हीही अनियतकालिके 'सायक्लोस्टाईल' (चक्रमुद्रित) होत असत.



अनुक्रमणिका

अशोक शहाणे यांच्या ह्या चळवळीचा कुठेतरी थोडासा मीही अप्रत्यक्ष साक्षीदार आहे; त्यामुळे त्यांचे मित्र मधू साबणे ह्यांनी लिहिलेला, लोकसत्तेची रविवार पुरवणी 'लोकरंग'मधील 'अशोक-द ग्रेट' हा लेख खूप भावला. त्याचा आधार घेऊन, महाराष्ट्र साहित्य पत्रिकेत दखल घेतली; आणि त्यांचे अभिनंदन करण्यासाठी म्हणून ही चौकट लिहिली होती. श्रद्धांजलीपर-लेख मालिकेत ती नको म्हणून पत्रिकेत अन्यत्र छापण्यासाठी ती बाजूला ठेवली होती. त्याचवेळी कादंबरीकार ह. मो. मराठे ह्यांनी अशोक जैन ह्यांची आठवण पाठविली. त्यांची सरमिसळ कशी झाली, ह्याच्या स्पष्टीकरणापेक्षा संपादक ह्या नात्याने मी ही जबाबदारी स्वीकारून पुढील अंकात केवळ स्पष्टीकरण देण्याचे मान्य केले. परंतु दहा वर्षे निष्ठेने केलेल्या सेवेची जराही पर्वा न करता; ज्यांना अशोक शहाणे आणि त्यांचे कार्य माहीतही नाही अशांनीही टीकेची संधी सोडली नाही!

मी व्यक्तिश: अशोक शहाणे यांना दीर्घ-आयु-आरोग्य लाभो अशी प्रार्थना करतो. ऐंशीव्या वर्षात पदार्पण केल्याबद्दल अभिवादनही करतो.

—संपादक, म.सा.पत्रिका, पुणे

---

## म.सा.प.च्या उत्कृष्ट शाखेला 'राजा फडणीस करंडक'



१९७९ पासून म. सा. प. शी संबंधित असलेले श्री. राजा फडणीस यांनी विविध पदांवर काम केले. कार्यवाह, कोषाध्यक्ष, प्रमुख कार्यवाह आणि नंतर २००६ ते २०११ पर्यंत विश्वस्त म्हणून काम केले. परिषदेविषयी खडानखडा माहिती असलेले हे एक अबोल व्यक्तिमत्त्व. कार्यकारी विश्वस्त असताना त्यांनी परिषदेच्या अर्थव्यवहाराला मोलाची शिस्त लावली. त्या शिस्तीचा आजच्या पदाधिकाऱ्यांना चांगलाच उपयोग होतो आहे, असे म्हटल्यास वावगे ठरू नये.

म. सा. परिषदेला आणि त्यांच्या सर्व शाखांना आपले कायमस्वरूपी स्मरण राहावे या हेतूने त्यांनी रुपये एक लाख परिषदेकडे कायम ठेव ठेवली असून या रकमेच्या व्याजातून परिषदेच्या सर्वोत्कृष्ट शाखेला दरवर्षी रुपये पाच हजाराचा पुरस्कार देण्याचे ठरविले आहे. याचे स्वरूप रु. ५०००/- रोख, फिरता करंडक (ज्याचे छायचित्र सोबत दिले आहे.) आणि मानपत्र असे राहाणार आहे. पहिला पुरस्कार सोलापूर शाखेला २७ मे २०१४ ला देण्यात आला. यापुढे दरवर्षी म.सा.प. च्या एका सर्वोत्कृष्ट शाखेला हा पुरस्कार देण्यात येणार आहे.

श्री. राजा फडणीस यांच्या या कल्पक पुरस्काराचे सर्व शाखांकडून अभिनंदन होत आहे. या पुरस्कारामुळे शाखांना आपल्या कामाला गती देता येईल. विविध उपक्रम आखता येतील, निरनिराळे उपक्रम राबविता येतील. पर्यायाने या पुरस्काराचा शाखांच्या प्रगतीसाठी खूप उपयोग होईल.

या पुरस्काराच्या कल्पकतेबद्दल राजा फडणीस यांचे अभिनंदन; आणि आभारही.

***

# २०१४ या वर्षातील म.सा.प.कडे आलेल्या पुस्तकांचे स्वागत

महेन्द्र मुंजाळ (कार्यवाह, ग्रंथालय)

| अनु. क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | वाङ्मयप्रकार | प्रकाशन |
|---|---|---|---|---|
| १. | पहाटेपूर्वीचा काळोख | कमलेश सोमण | कादंबरी | संदर्भ प्रकाशन |
| २. | संवाद | माणिक गेडाम | कवितासंग्रह | मध्यमा प्रकाशन |
| ३. | मेगा भुईच्या सांदताना | हनुमंत चांदगुडे | कवितासंग्रह | अक्षर वाङ्मय प्रकाशन |
| ४. | खचू लागली भुई | नीलम माणगावे | कवितासंग्रह | कविताधार प्रकाशन |
| ५. | शब्दमोहिनी | चारुशीला बेलसरे | कवितासंग्रह | श्रीकला प्रकाशन |
| ६. | अंतर्वाटा | अनुराधा मुजुमदार | कवितासंग्रह | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ७. | माझं गाव माझं शिवार | संतोष गाढवे | कवितासंग्रह | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ८. | त्सुनामी | पूजा आकोटकर | कवितासंग्रह | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ९. | बदलत्या जीवनशैली | दिलीप कुलकर्णी | विज्ञानविषयक | राजहंस प्रकाशन |
| १०. | बुंडी ते बुंग | पूजा आकोटकर | बालसाहित्य | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ११. | ब्रह्मांड (नवी आवृत्ती) | मोहन आपटे | विज्ञानविषयक | राजहंस प्रकाशन |
| १२. | रंग समुपदेशनाचे | संपा. वनिता पटवर्धन | संपादित | अनघा प्रकाशन |
| १३. | रोमांचकारी रेल्वे | उषा तांबे | ललित | राजहंस प्रकाशन |
| १४. | भास्कर | मोहन आपटे | चरित्र | राजहंस प्रकाशन |
| १५. | ऊर्जा संयम | दिलीप कुलकर्णी | विज्ञानविषयक | राजहंस प्रकाशन |
| १६. | हरित साधक | संपा. सदानंद बोरसे | व्यक्तिचित्रण | राजहंस प्रकाशन |
| १७. | काचेचं घर | ईश्वरी तांबे | काव्यसंग्रह | नलिनी प्रकाशन |
| १८. | चांदरात | सुभाष पवार | कवितासंग्रह | लोकगौरव प्रकाशन |
| १९. | सहकार धुरीण | अरुण साधू | चरित्र | रोहन प्रकाशन |
| २०. | उभारी | मेघा टिळेकर | काव्यसंग्रह | चपराक प्रकाशन |
| २१. | जिजाऊची निष्ठा | मेघा टिळेकर | काव्यसंग्रह | चपराक प्रकाशन |
| २२. | शब्दमोहिनी | चारुशीला बेलसरे | काव्यसंग्रह | श्रीकला प्रकाशन |
| २३. | ऋतुचक्र | राजीव पवार | कवितासंग्रह | डिंपल प्रकाशन |
| २४. | तू दिलेले गीत माझे | मंजिरी पित्रे-गणपुले | कथासंग्रह | उत्कर्ष प्रकाशन |
| २५. | रणझुंजार | श्यामला पानसे | कथासंग्रह | पानसे प्रकाशन |
| २६. | वेल जांभळी | शंकर पंडित | कवितासंग्रह | पुनर्वसन प्रकाशन |
| २७. | साधेच शब्द दोन | शंकर पंडित | कवितासंग्रह | पुनर्वसन प्रकाशन |
| २८. | तुकारामांचे निवडक अभंग : एक आस्वादन | डॉ. कमलेश सोमण | धार्मिक | संदर्भ प्रकाशन |
| २९. | परतीचा रस्ता नाहीय | श्रीधर नांदेडकर | कवितासंग्रह | पॉप्युलर प्रकाशन |
| ३०. | मुक्ताई ते सोनाई | डॉ. ललिता गुप्ते | धार्मिक | ललिता गुप्ते प्रकाशन |
| ३१. | छत्रपती थोरले शाहुमहाराज | आसाराम सैंदाणे | चरित्र | प्रतिमा प्रकाशन |
| ३२. | इंदिरा संत यांचे काव्यसंग्रह | प्रभाकर घोडके | समीक्षा | यशोदीप प्रकाशन |
| ३३. | प्रेमाग्नी | आनंद गवळी | कथासंग्रह | यशोदीप प्रकाशन |
| ३४. | अकल्पित विश्व | नंदकुमार येवले | कथासंग्रह | यशोदीप प्रकाशन |
| ३५. | अनुक्रमणिका | प्रशांत डिगणकर | कथासंग्रह | नितांत प्रकाशन |
| ३६. | अल्पसंख्याकांच्या विकासासाठी योजना व सवलती | महेश अलापुरे | माहितीपर | साकेत प्रकाशन |
| ३७. | बोलका शंख (नवी आवृत्ती) | ग. दि. माडगूळकर | कथासंग्रह | साकेत प्रकाशन |
| ३८. | बांधावरच्या बाभळी (नवी आवृत्ती) | ग. दि. माडगूळकर | कथासंग्रह | साकेत प्रकाशन |
| ३९. | सुनंदायन | सुनंदा येडके | आत्मचरित्र | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ४०. | मेघनाद | मेघराज पाटील | कवितासंग्रह | स्नेहवर्धन प्रकाशन |

| अनु. क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | वाङ्मयप्रकार | प्रकाशन |
|---|---|---|---|---|
| ४१. | पद्मश्री काकासाहेब वाघ | राहुल पाटील | चरित्र ग्रंथ | कर्मवीर प्रकाशन |
| ४२. | माझी आई | संपा. स्नेहल तावरे | संपादित | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ४३. | गुणवत्ता व्यवस्थापन आणि विकास | संजय कप्तान | शैक्षणिक | स्नेहवर्धन प्रकाशन |
| ४४. | दीपकळिका धाकुटी | मालती परांजपे | चरित्र | उत्कर्ष प्रकाशन |
| ४५. | साहित्य दरवळ | अनिल वळेल | ललित | उत्कर्ष प्रकाशन |
| ४६. | भावलेल्या व्यक्ती | दुर्गानंद गायतोंडे | चरित्र | उत्कर्ष प्रकाशन |
| ४७. | बहुरंगी | सुरेश गरसोळे | चरित्र | उत्कर्ष प्रकाशन |
| ४८. | आठवणीतील माणसं | प्र. चिं. शेजवलकर | व्यक्तिचित्र | उत्कर्ष प्रकाशन |
| ४९. | महापूर | रुद्रास कदम | कादंबरी | जनशक्ती प्रकाशन |
| ५०. | सतत गैरहजर सबब नाव कमी | धोंडूजा इंगोले | कादंबरी | ज़नशक्ती प्रकाशन |
| ५१. | विषयांतर | चंद्रकांत पाटील | व्यक्तिचित्रे | जनशक्ती प्रकाशन |
| ५२. | मातृपंचक | संपा. संदीप सांगळे | संपादन | यशोदीप प्रकाशन |
| ५३. | माती मोकळी होताना | स्वाती शिंदे-पवार | कवितासंग्रह | प्रतिमा प्रकाशन |
| ५४. | वेदनेच्या तळाशी | स्वाती शिंदे-पवार | कवितासंग्रह | प्रतिमा प्रकाशन |
| ५५. | काळजासाठी काही ओळी | स्वाती शिंदे-पवार | कवितासंग्रह | प्रतिमा प्रकाशन |
| ५६. | या वेशीपासून त्या वेशीपर्यंत | इंद्रजित घुले | कवितासंग्रह | सई प्रकाशन |
| ५७. | धर्मवीर संभाजीराजे | दत्ता देशमुख | कवितासंग्रह | धर्मयोद्धा प्रकाशन |
| ५८. | अब्जक तीर्थ मंजरथ | बाळकृष्ण दीक्षित | धार्मिक | चिन्मय प्रकाशन |
| ५९. | आत्मस्वर | डॉ. सुनीलकुमार लवाटे | आत्मकथन | साकेत प्रकाशन |
| ६०. | बोलू कौतुके | एकनाथ पगर | ललित | साकेत प्रकाशन |
| ६१. | साकेत इंग्लिश स्पिकिंग कोर्स | गौरी साळवेकर | शैक्षणिक | साकेत प्रकाशन |
| ६२. | मराठी कादंबरीची उपयोजित समीक्षा | गोमटेश्वर पाटील | समीक्षा | दर्या प्रकाशन |
| ६३. | मराठी कादंबरी : तत्त्व आणि सिद्धांत | गोमटेश्वर पाटील | समीक्षा | दर्या प्रकाशन |
| ६४. | सर्वस्व | शिवराज गोर्ले | कादंबरी | कॉन्टिनेन्टल प्रकाशन |
| ६५. | ग्रेसच्या कविता | श्रीनिवास हवलदार | समीक्षा | कॉन्टिनेन्टल प्रकाशन |
| ६६. | अज्ञातवासींची कविता | तुकाराम शेट्टे | कवितासंग्रह | तुकाराम प्रकाशन |
| ६७. | छत्रपती शिवाजी शाहुमहाराज | आसाराम सैंदाने | चरित्र | प्रतिमा प्रकाशन |
| ६८. | एकलव्य : काल आणि आज | डॉ. लक्ष्मण महामने | चरित्र | विद्या प्रकाशन |
| ६९. | बंधळा | बाळ पाटील | काव्यसंग्रह | कैलास प्रकाशन |
| ७०. | ॲनी | पद्मजा ताम्हणकर | कथासंग्रह | सुहास्यरेखा प्रकाशन |
| ७१. | टेकडीवरचा बदाम | मीरा | ललितसंग्रह | माणिक प्रकाशन |
| ७२. | शिवछत्रपती समर्थ योग | संपा. मंदार रामदासी | संपादित | श्री रामदासस्वामी संस्थान प्रकाशन |
| ७३. | अभिजन प्रियजन | मृदुला जोशी | संपादित | विश्वसखा प्रकाशन |
| ७४. | धर्मकन्या | विनायक आंबेकर | कादंबरी | आंबेकर प्रकाशन |
| ७५. | काव्यपुष्पांजली | पुष्पा बोपार्डीकर | कवितासंग्रह | सुखदा प्रकाशन |
| ७६. | बोला व्यासपीठावर | ज्ञानेश्वर शिंदे, गागलवेगावकर | शालेय | इसाप प्रकाशन |
| ७७. | मराठी हस्तलिखितांची समग्र सूची | संपा. वा.ल.मंजूळ | सूचिवाङ्मय | उत्कर्ष प्रकाशन |
| ७८. | प्राचीन आणि मध्ययुगीन भारतीय धातुशास्त्रांचा संक्षिप्त इतिहास | डॉ. प्रविण देशपांडे | ऐतिहासिक | रा.म.वि.सं. प्रकाशन |
| ७९. | काव्य गाथा शिवरायाची | राजेश अघटराव | काव्यसंग्रह | शारदा प्रकाशन |

| अनु. क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | वाङ्मयप्रकार | प्रकाशन |
|---|---|---|---|---|
| ८०. | आम आणि खास | रमेश दिघे | चरित्र | मीना प्रकाशन |
| ८१. | शिक्षण, शिक्षक व अभ्यासक | वासुदेव पटवर्धन | शिक्षणविषयक | रा.म.वि.सं. प्रकाशन |
| ८२. | तारकांची मैत्री | उषा श्रीनिवास | भाषांतरित | रा.म.वि.सं. प्रकाशन |
| ८३. | भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकास | दिनेश माहुलकर | भाषाविषयक | रा.म.वि.सं. प्रकाशन |
| ८४. | भारतीय इतिहासातील काही अभ्यासविषय | अनु. जास्वंदी उटगीकर | ऐतिहासिक | रा.म.वि.सं. प्रकाशन |
| ८५. | मराठी ग्रंथसूची भाग-६ | संपा. शरद साठे | सूची वाङ्मय | रा.म.वि.सं. प्रकाशन |
| ८६. | एन्जॉय द लाईफ | मनोहर मांडवले | आत्मकथन | सायन प्रकाशन |
| ८७. | अभंगदास गणेशाचे | राजेश अधटराव | काव्यसंग्रह | शारदा प्रकाशन |
| ८८. | रंग | सौ. माधुरी मंगरूळकर | कवितासंग्रह | उदवेली बुक्स प्रकाशन |
| ८९. | आंच (भाऊ प्रधान-आत्मकथन) | शब्दांकन : माधवी पाटणकर | आत्मकथन | अनामिका प्रकाशन |
| ९०. | आधुनिक स्त्रीवादी कविता | डॉ. स्मिता भुसे | समीक्षा | ऋतु प्रकाशन |
| ९१. | वापाचा ७/१२ | गिरिश पाटील | कवितासंग्रह | मनोगुज प्रकाशन |
| ९२. | वेंधळा | बाळ पाटील | कवितासंग्रह | कैलास प्रकाशन |
| ९३. | निळा प्रकाश | अनु. धनश्री हळबे | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| ९४. | क्षणैक | मीना खोंड | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| ९५. | विननात्याचा माणूस | विभावरी वाकडे | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| ९६. | रूपेरी | प्रकाश पाठक | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| ९७. | मनोव्यथांच्या कथा | डॉ. मनोहर धडफळे | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| ९८. | वकुळीची माळ | मालती दामले | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| ९९. | नवलं कथा | भारती पांडे | कथासंग्रह | अक्षता प्रकाशन |
| १००. | नावातच सारं काही... | प्रशांत भागवत | कवितासंग्रह | सदालक्ष्मी प्रकाशन |
| १०१. | मेघडंबरी | उल्हास गोगटे | कवितासंग्रह | विश्वतारा प्रकाशन |
| १०२. | बालोद्यान | श्रीनिवास कुलकर्णी | बालसाहित्य | स्वप्रकाशित |
| १०३. | मरणात खरोखर जग हसते | स्टॅन्ली गोन्सालविस | ललितसंग्रह | डिंपल प्रकाशन |
| १०४. | सौंदर्याच्या गर्भातून | राजन लाखे | कवितासंग्रह | दिलीपराज प्रकाशन |
| १०५. | लव्ह मॅरेज | सीमा सोनावणे | कादंबरी | दिलीपराज प्रकाशन |
| १०६. | फिल्मी दुनिया | सदानंद गोखले | चित्रपटविषयक | दिलीपराज प्रकाशन |
| १०७. | ऐसे बोलावे बोल | मधुकर काकडे | व्यक्तिमत्त्व विकासविषयक | दिलीपराज प्रकाशन |
| १०८. | कौशल्यविकास | संजय नाईक | माहितीपर | दिलीपराज प्रकाशन |
| १०९. | जन्मतारखेतील गूढ | मधुसूदन घाणेकर | ज्योतिषविषयक | दिलीपराज प्रकाशन |
| ११०. | आथारी | पांडुरंग मोरे | कथासंग्रह | दिलीपराज प्रकाशन |
| १११. | वन्य प्राण्यांची दुनिया | रमेश मघले | ललित | दिलीपराज प्रकाशन |
| ११२. | कथा युद्धकौशल्याच्या | राजा लिमये | कथासंग्रह | दिलीपराज प्रकाशन |
| ११३. | पाखरांची दुनिया | रमेश मघले | ललित | दिलीपराज प्रकाशन |
| ११४. | पर्यावरणाचे रक्षक | पुंडलिक गेवादे | ललित | दिलीपराज प्रकाशन |
| ११५. | अंधश्रद्धा निर्मूलनाच्या कथा | साने गुरुजी कथामाला | वैचारिक | दिलीपराज प्रकाशन |
| ११६. | फुलराणी : सायना नेहवाल | मिलिंद ढमढेरे | चरित्रात्मक | दिलीपराज प्रकाशन |
| ११७. | अति तेथे माती | साने गुरुजी कथामाला | वैचारिक | दिलीपराज प्रकाशन |
| ११८. | भारताचे वहादर | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| ११९. | विज्ञान गमती | प्रकाश नवाळे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२०. | एक होता तेज:पुंज | रवींद्र जवादे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२१. | हळु गळु, पळु गळु व इतर कथा | म. वि. कोल्हटकर | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |

| अनु. क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | वाङ्मयप्रकार | प्रकाशन |
|---|---|---|---|---|
| १२२. | नौसेनेचा वाजे डंका | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२३. | नभी झुंजले वायुपुत्र | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२४. | लढले पौरूष देशासाठी | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२५. | बांगला मुक्तिसंग्राम | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२६. | असा लढला बांगला | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२७. | विजयंता भारत - १ ते ४ भाग | अशोक देशपांडे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२८. | बाप्पांशी गप्पा | नयना राजे | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १२९. | हसत-खेळत | गौरी कुलकर्णी | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १३०. | मूर्खांचा पाहुणचार | सुहास शिरवळकर | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १३१. | बक्षीस | सुहास शिरवळकर | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १३२. | आजोबांची कुंची व इतर कथा | म. वि. कोल्हटकर | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १३३. | टिल्लोजी | डॉ. लीला दीक्षित | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १३४. | कुणाचं असं अन् कुणाचं तसं | श्रीपाद कुलकर्णी | बालसाहित्य | दिलीपराज प्रकाशन |
| १३५. | मनात आलं म्हणून | राजीव बर्वे | ललितलेख | दिलीपराज प्रकाशन |
| १३६. | अक्षरांचा परिमळु | शिरिष लांडगे | समीक्षा | स्नेहवर्धन प्रकाशन |
| १३७. | आरमच्या किनारी | जी. एम. जाधव | आत्मचरित्र | स्नेहवर्धन प्रकाशन |
| १३८. | भिंत | गुणवंत पाटील | लघु खंडकाव्य | स्नेहवर्धन प्रकाशन |
| १३९. | स्मरण चांदणे | विदुला जवळगेकर | आत्मकथन | स्नेहवर्धन प्रकाशन |
| १४०. | इंद्रधनुष्य | सं. जया कदम, हनुमंत माने | कवितासंग्रह | स्नेहवर्धन प्रकाशन |
| १४१. | आभाळवाट | मधुकर गिलविले | आत्मकथन | स्नेहवर्धन प्रकाशन |
| १४२. | सप्तर्षी आणि अरुंधती | सुमती देवस्थळे | चरित्रकथा | राजहंस प्रकाशन |
| १४३. | सुरसंगत | धोंडुताई कुलकर्णी | आत्मकथन | राजहंस प्रकाशन |
| १४४. | संपादित सानिया | संपा. रेखा इनामदार-साने वंदना बोकील-कुलकर्णी | संपादित | राजहंस प्रकाशन |
| १४५. | अनसूयाबाई आणि मी | पुरुषोत्तम बा. काळे | आत्मचरित्र | राजहंस प्रकाशन |
| १४६. | गल्लत गफलत महजब | राजीव साने | लेखसंग्रह | राजहंस प्रकाशन |
| १४७. | मेळघाटावरील माहेर | मृणालिनी चितळे | चरित्र | राजहंस प्रकाशन |
| १४८. | सृजनाचा मळा | फादर फ्रान्सिस दिब्रिटो | लेखसंग्रह | राजहंस प्रकाशन |
| १४९. | गांधीजींचे असामान्य नेतृत्व | अनु. सुजाता गोडबोले | अनुवाद | राजहंस प्रकाशन |
| १५०. | जवाहरलाल नेहरूंचे नेतृत्व | माधव गोडबोले | चरित्रात्मक | राजहंस प्रकाशन |
| १५१. | मुळारंभ | डॉ. आशुतोष जावडेकर | कादंबरी | राजहंस प्रकाशन |
| १५२. | मनोगावे कुपेरदर्शन मणिपूर | शशिधर भावे | प्रवासवर्णन | राजहंस प्रकाशन |
| १५३. | बुद्धिबळाचा श्रीगणेशा | रविंद्र मिराशी | बालसाहित्य | राजहंस प्रकाशन |
| १५४. | अचूक दिशा, सुयोग्य मार्ग १,२ | सुरेश वांदिले | माहितीपर | राजहंस प्रकाशन |
| १५५. | हे विश्वाचे अंगण | सुधीर जांभेकर | आत्मकथन | राजहंस प्रकाशन |
| १५६. | दलितांतील नोकरशाही | ॲड. दादासाहेब सोनावणे | ललित लेख | पृथ्वीराज प्रकाशन |
| १५७. | गुरू ग्रंथसाहिबमधील संत नामदेव | सुषमा नहार | संतसाहित्य | चिनार प्रकाशन |
| १५८. | येशू ख्रिस्ताचे शिष्य | व्ही. जी. डोंगरे | वैचारिक | स्वप्रकाशित |

***



**श्री. नामदेव महाराज**

(घुमान (पंजाब) येथील श्री नामदेव महाराजांचे स्मृतिमंदिरातील पितळी पत्र्यावरील चित्राच्या अनुरोधानें)

**संदर्भ :** नामदेव चरित्र - ले. वै. माधवराव अप्पाजी मुळे, प्र. रंगनाथ हरि भाळुंकर व सौ. शांता रंगनाथ भाळुंकर, २७०, म. गांधी रोड पुणे १. मुद्रक : भाऊ ल. कोकाटे, हनुमान छापखाना, ३०० सदाशिव पेठ, पुणे २. पुनर्मुद्रण सन-१९५२

***''सुंबाचा करदोंडा रकट्याची लंगोटी । नामा वाळवंटी कथा करी ।।***

*संत जनाबाई*

**घुमान, गुरुदासपूर,(पंजाब) तथा 'नामदेवकी घुमानी' येथे, एप्रिल २०१५ मध्ये अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन होत आहे.**

**नामदेव महाराजांनी तेथे वारकरी संप्रदायाची गुढी उभारली.**

पु.स संत मंदार शरदचंद्र
१३८. १५६७ सदाशिव पेठ,
पुणे – ४११ ०३०

बुक

₹7.00
P140747

प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरभाष : ०२०- २४४७५९६३.


Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : September 2014
Registered with the register of Newspaper for India under No.
*Book Pkt. Periodical Category*